# वीरशैव
# अष्टावरण-विज्ञान



डॉ. चन्द्रशेखर शिवाचार्य

वेदान्ताचार्य विद्यावारिधि

Guru Amareshwar Granthamala : 6

# VEERASHAIVA ASHTĀVARAṆ-VIJNYĀNA

By

**DR. CHANDRASHEKHAR SHIVACHARYA**

*Research Associate Dept. of Vedanta*

**Sampurnanand Sanskrit University**

VARANASI

Translated By

**KUMAR KOTHAWALE**

Asst. Editor, "Sanchar", Solapur

**SHRI GURU AMARESHWAR PRAKASHAN**

**Amareshwarmath**

**Guledgudd–587203**

**1985**

Copies can be had from :

Dr. Chandrashekhar Shivacharya Swamiji

Amareshwarmath, GULEDGUDD–587203

Dist : Bijapur ( Karnatak )

Manager

Jangamawadimath

VARANASI–221001 ( U. P. )

First Edition : 1985

Copies : 3000

Price : Rs. 15.0



Printed by

Abhay Kumar

Aryabhushan Press,

Brahmaghat, Varanasi.

श्री गुरु अमरेश्वर ग्रन्थमाला : पुष्प ६

# वीरशैव अष्टावरण-विज्ञान

लेखक

डॉ० चन्द्रशेखरशिवाचार्य

रिसर्च-एसोशिएट, वेदान्तविभाग

सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालय, वाराणसी

अनुवादक

गंगाधर धोंडो ऊर्फ कुमार कोठावळे

साहित्यविशारद, वीरशैवसाहित्यरत्न,

सोलापुर

श्री गुरु अमरेश्वर प्रकाशन, अमरेश्वरमठ

गुळेदगुड्ड--५८७२०३

१९८५ ई.

वेदागमोपनिषत्-पुराणेतिहास-सकलशास्त्रसुप्रसिद्ध-विमल

वीरशैवमहामतस्थापनाचार्य पञ्चाचार्यपरम्परागत

श्री काशीविश्वाराध्यज्ञानसिंहासनाधीश्वर

श्री १००८ जगद्गुरु विश्वेश्वर-

शिवाचार्य महास्वामीजींच्या

चरणकमलीं हा ग्रन्थ-

पुष्प सादर

समर्पित





श्री १००८ जगद्गुरु विश्वेश्वरशिवाचार्य
महास्वामीजी संस्थान जंगमवाडीमठ
श्री क्षेत्र काशी ( वाराणसी )



श्री ष० ब्र० डॉ० चन्द्रशेखरशिवाचार्यस्वामीजी
अमरेश्वरमठ, गुलेदगुड्ड



श्री काशी विश्वाराध्य-ज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८
जगद्गुरु विश्वेश्वरशिवाचार्य मह.स्वामीजी
जंगमवाडीमठ वाराणसी यांचे

## शुभाशीर्वचन

सनातन वीरशैव धर्मांत अष्टावरण, पञ्चाचार आणि षट्स्थल हे तीन प्रमुख तत्त्व स्वीकार केलेले आहेत. हे तीन्हीं तत्त्व क्रमशः साधकाचे अङ्ग, प्राण आणि आत्मा म्हणून मान्य केले जातात. ह्या तीन्हीं तत्त्वांचे मौलिक आणि प्रामाणिक विवरण 'सिद्धान्तशिखामणि', 'श्रीकरभाष्य', 'क्रियासार', 'लिङ्ग-धारण-चन्द्रिका', 'चन्द्रज्ञानागम' वगैरे वीरशैव धर्मसम्बन्धी संस्कृत ग्रन्थांत उपलब्ध आहे.

दुरूह संस्कृत साहित्यांत विद्यमान ह्या तीन्हीं तत्त्वांचे विवरण साम्प्रत जनभाषेत उपलब्ध करून देणे नितान्त आवश्यक आहे. ह्या आवश्यकतेच्या पूर्तीसाठीं आमच्या विश्वाराध्य गुरुकुलाचे विद्वान् गुळेदगुड्डचे अमरेश्वरमठाध्यक्ष श्री ष. ब्र. डॉ. चन्द्रशेखरशिवाचार्य ह्यांनी अत्यन्त परिश्रम करून अनेक ग्रन्थांच्या आधाराने साधकाच्या रक्षाकवचरूपाने स्वीकृत गुरु, लिंग, जंगम, विभूति, रुद्राक्ष, मन्त्र, पादोदक आणि प्रसाद नावांच्या अष्टावरणाच्या सम्बन्धांत आपल्या विद्वत्तापूर्ण लेखनींतून "वीरशैव अष्टावरण-विज्ञान" नामक अति-अमूल्य हिन्दी ग्रन्थाची रचना केली आहे. ह्या ग्रन्थाचे विधिवत् विमोचन दि. ७-६-१९८५ रोजी ऊखीमठांत केदार रावल श्री १००८ जगद्गुरु

सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजीच्या पट्टाभिषेकाच्या शुभप्रसंगी झाले होते.

डॉ. चन्द्रशेखरशिवाचार्य ह्यांची प्रतिभा अत्यन्त अलौकिक आहे ह्यांनी काशींत अध्ययनासाठीं येऊन मात्र तीन वर्षांत सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालय (वाराणसी) ची वेदान्ताचार्य परीक्षा सर्वोच्च श्रेणींत उत्तीर्ण होऊन तीन सुवर्णपदकें मिळविली. १९७३ ई. वर्षांत केरलमध्ये गुरुवायूर स्थानीं केन्द्रशासन द्वारा आयोजित अखिल भारतीय संस्कृत-भाषण स्पर्धेंत उत्तर प्रदेशाच्या प्रतिनिधिरूपानें भाग घेऊन वेदान्तविषयक सर्वप्रथम पारितोषिक मिळविले.

१९८१ ई. मध्ये वीरशैवधर्मग्रन्थ 'सिद्धान्तशिखामणि' चा अभ्यास करून संस्कृत शोध-प्रबन्ध लिहिला व तो प्रस्तुत करून सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालयाची 'विद्यावारिधि' ( Ph. D. ) शोधपदवी मिळविली. सध्या "शक्तिविशिष्टाद्वैत (वीरशैव) सम्मततत्त्वत्रयविमर्शः" ह्या विषयावर संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागांत अनुसन्धानोपाध्याय योजना ( रिसर्च एसोशिएट स्कीम ) अन्तर्गत 'वाचस्पति' ( D. Litt ) उपाधि प्राप्तिसाठी शोध-कार्य करीत असतांना शास्त्री आणि आचार्य कक्षांमध्ये 'शक्तिविशिष्टाद्वैत-वेदान्त'विषयक अध्यापनकार्य करीत आहेत. हिन्दीभाषेंत लिहिलेला आपला 'वीरशैवदर्शनकोष' लौकरच केन्द्रीय हिन्दी निदेशालय, नई दिल्ली द्वारा प्रकाशित केला जाणार आहे.

हिन्दी जरी राष्ट्रभाषा असली, तरी महाराष्ट्राचा अधिकांश जनसमूह ह्या भाषेशी अपरिचित आहे. म्हणून ह्यांनी लिहिलेल्या "वीरशैव अष्टावरण-विज्ञान" नामक हिन्दी ग्रन्थाचा लाभ सर्वांना होत नव्हता. ह्यास्तव

सोलापुरचे सुप्रसिद्ध पत्रकार आणि नाटककार एवं कवि 'वीरशैवसाहित्यरत्न' कुमार कोठावळे ह्यांनी आठवड्याच्या आंत सुन्दर मराठी भाषान्तर करून एक चमत्कारच केला आहे. मराठींत अनूदित ह्या ग्रन्थाला पाहून आम्हास अपार हर्ष होत आहे.

ह्या ग्रन्थाच्या प्रकाशनासाठी सौ. ताराबाई कलशेट्टि ( सोलापुर ) आणि श्रीमती पार्वतम्मा ( शिवयोगाश्रम, आळूर ) ह्या दोघांनी उदारतापूर्वक देणगी देऊन साहित्यक्षेत्राची अत्युत्तम सेवा केली आहे. न केवळ महाराष्ट्रीय वीरशैवानुयायी, अपितु सगळ्याच भाविक लोकांनी ह्या ग्रन्थाचे समुचित अध्ययन, मनन आणि चिन्तन करून अष्टावरणांत निष्ठा ठेऊन षट्स्थलमार्गात प्रवृत्त राहून आपले जीवन सार्थक केले पाहिजे.

शेवटी श्री जगद्गुरु पञ्चाचार्यांच्या चरणीं आम्ही प्रार्थना करतो की ग्रन्थकार, भाषान्तरकार, देणगीदार, हितैषी वाचक, सर्वांच्या अन्तःकरणांत स्वधर्माच्या प्रति आदरभावना आणि त्यांची धर्ममार्गात अनुरक्ति उत्तरोत्तर वाढीत जाओ. इति शिवम् ।

गणेश चतुर्थी इत्याशिषः

२०४२ वि० सं०

१८-९-८५

## प्रणामपूजन—

'वेदान्ताचार्य', 'विद्यावारिधि' पूज्य श्री ष. ब्र. डॉ. चन्द्रशेखरशिवाचार्य अमरेश्वरमठ गुळेदगुड्ड यांची सोलापुर शहरांत नुकतीच महिनाभर सुश्राव्य प्रवचनें झाली. त्यांची विद्वत्ता, प्रसन्न प्रवचनशैली यामुळें श्रोते आकृष्ट होत असत. त्यांनी लिहिलेल्या प्रासादिक 'वीरशैव अष्टावरण-विज्ञान' या हिन्दी ग्रन्थाचें मराठी भाषान्तराचें कार्य मी स्वीकारलें व अवघ्या एका आठवडयात मी ग्रन्थ अनुवादित करून प्रवचनसमाप्तीच्या मंगलदिनीं त्यांच्या स्वाधीन केला. स्वामीजी अत्यन्त प्रसन्न झाले. ह्या ग्रंथाचे त्वरित मुद्रणकार्य वाराणसीस सुरू करण्यांत आले. अल्पावधीतच छपाई पूर्ण होऊन हा ग्रन्थ भाविक वाचकांच्या सेवेस येत आहे.

वीरशैव साहित्याबद्दल मी कांहीं ग्रन्थ लिहिले. त्यांचे रसिक वाचकांनी स्वागत केले. मी कृतज्ञ आहे. हा अनुवादित ग्रन्थही रसिकमान्य होईल ही अपेक्षा.

गेलीं ५० वर्षें मी विविध प्रकारें साहित्य-सेवा केली आहे. नाट्य, काव्य, लेख, चरित्र, कादम्बरी, संशोधनात्मक ग्रन्थ इ. विविध लेखन केले. गेलीं ३५ वर्षें मी पत्रकारितेंच्या व्यवसायानें अनेक विषयावर लेख लिहिले आहेत. वीरशैव साहित्यावरील माझें लेखन हा त्यापैकींच एक भाग होय. यथाशक्ति मी ही सेवा केली आहे.

माझ्यावर अकृत्रिम प्रेम करणारे व ज्यांच्या प्रेरणेनें कोल्हापुरच्या श्री वीरशैव बँकेने मला दहा हजार रुपये माझ्या साहित्य-सेवेबद्दल देणगी दिली, ते माझे पितृवत् दे. भ. पद्मश्री रत्नप्पा अण्णा कुंभार, कोल्हापुर यांना मी त्यांच्या ७६व्या वाढदिवशी ही अनुवाद-सेवा समर्पण करीत आहे. पूज्य डॉ. चन्द्रशेखरशिवाचार्य यांनी ही संधि मला उपलब्ध करून दिली, त्याबद्दल त्यांना अनन्त प्रणाम.

'संपदा'
पत्रकारनगर, सोलापुर
दि० १५-९-१९८५

शरणचरणरज
**कुमार कोठावळे**

दो न दा न वी रां ग ना



१. श्रीमती पार्वतम्मा शिवयोगाश्रम,
आळूर ( जि० बीजापुर )



२. सौ. ताराबाई सिद्रामप्पा कलशेट्टी
सोलापुर

## दोन दानवीरांगना

### १. श्रीमती पार्वतम्मा

ह्या श्री श्रो. ब्र. शिवकुमारस्वामीजी ( चिदम्बराश्रम, बीदर ) ह्यांच्या मातोश्री आहेत, आणि सध्या कर्नाटकाच्या आळूरस्थित शिवयोगाश्रमात निवास करतात. ह्यांना धर्मप्रचाराची अत्यन्त आवड आहे. त्यामुळे ह्या सदैव उदार अन्तःकरणाने देणग्या देत असतात.

ह्यांचा जन्म कर्नाटकातील बीजापुर जिल्ह्याच्या इन्डी तालुकेंत असलेल्या 'बबलाद' गांवात राहणारे श्रीमान् दादागौड ह्यांची धर्मपत्नी सौ. तंगेम्माच्या पवित्र कुक्षितून झाला. हे दम्पती वीरशैवधर्मानुयायी होते. ह्यांना सात बहिणी आणि तीन भाऊ आहेत. श्रीमती पार्वतम्माचा विवाह महाराष्ट्रातील स्वातन्त्र्यसेनानी श्रीमान् सिद्रामप्पा सोलापुरकर ह्यांचे चिरंजीव श्रीमान् कल्लप्पा सोलापुरकर ह्यांच्या बरोबर झाला. मूळ सोलापुरवासी असतांना देखील ह्यांची चल-अचल सम्पत्ती बीजापुर जिल्ह्यातील 'पडनूर' गांवातही असल्यामुळे ते तिथेंपुद्धा रहात असत. अधिकांशतः त्यांचा मुक्काम सोलापुरांतच असे.

सोलापुरांत परमतपस्विनी रुद्राम्बिका महामाता हिचा मठ अत्यन्त प्रसिद्ध आहे. तो मठ श्रीमती पार्वतम्माच्या अगदी घराशेजारी असल्यामुळे गृहकृत्य आटोपल्यानन्तर त्या मठांत जाऊन श्रद्धापूर्वक सेवा करीत असत. ह्या सेवेच्या फलस्वरूप त्यांना कांहीं काळ लोटल्यानन्तर पुत्ररत्नाची प्राप्ती झाली.

ह्या मुलांचा नामकरणसंस्कार सामान्य मुलांसारखा घरात झाला नाही, अपितु महातपस्विनी रुद्राम्बिका मातेच्या मठांत मातेच्या उपस्थितींत अनेक

शिवभक्तांनी एकत्रित होऊन तो साजरा केला. तेव्हांपासून तो बालक वीर-कुमार नावांने सम्बोधित झाला. सहाव्या महिन्यांतच तो बालक पितृविहीन झाला.

पिताश्रीच्या देहावसानानंतर देखील परमपिता परमेश्वर आणि परम-तपस्विनी रुद्राम्बिका महामातेच्या कृपेमुळे त्या बालकाची उत्तरोत्तर सर्वंतोमुखी उन्नति होत गेली. सोलापुर आणि पडनूर गावांत त्याचे ( वीरकुमारचे ) प्राथमिक शिक्षण संपल्यानन्तर माध्यमिक शिक्षण घेण्यासाठी त्या बालकास बीजापुरांमध्ये पाठविले गेले. तेथे हॉयस्कूलमध्ये शिक्षण घेत असतांना जन्मो-जन्मीच्या पुण्यप्रभावाने लौकर वैराग्याचा उदय त्यांच्या मनांत झाला आणि त्यांच्या अन्तःकरणांत सन्यास घेण्याची उत्कण्ठा वाढली. आद्य शंकराचार्यां-प्रमाणें घरात येऊन वीरकुमाराने आपल्या मातोश्रीस सन्यास घेण्यासाठी अनुमति मागितली. एकुलत्या एक मुलाने सन्यास घेतल्यानंतर वंशदीप विजेल हा विचार करून मातोश्री पार्वतम्माने लगेच सन्यासाची परवानगी दिली नाही. परंतु वीरकुमाराच्या अन्तःकरणांत वैराग्याचा आवेग अत्यन्त तीव्र असल्यामुळे निरुपायानें त्यांनी परवानगी दिली.

मातोश्रीची अनुज्ञा घेऊन वीरकुमारानें श्रावण मासानिमित्त बीजा-पुरांतील षण्मुखारूढमठांत शास्त्रीय प्रवचनासाठी आलेले हुब्बळीस्थित श्री सिद्धारूढस्वामीजींचे शिष्य श्री श्रो. ब्र. शिवपुत्रस्वामीजींचे शिष्यत्व स्वीकार केले आणि काहीं दिवस बीजापुरांत त्यांच्या सन्निधींत राहून पुन्हा त्यांच्या बरोबर हुबळीस गेले. तेथे जवळ-जवळ चार वर्षापर्यंन्त गुरुसेवेंत राहून निजगुणशिवयोगींच्या षट्शास्त्रांचे उत्तमरीतिनें अध्ययन केले, आणि निजगुणशिवयोगिसम्मत वेदान्तशास्त्रांत प्राविण्य मिळविले.

नंतर हुबळीतील श्री नित्यानन्दस्वामींच्या प्रेरणेप्रमाणें हरद्वार आणि मुंबईच्या सन्यासाश्रमाचे महामण्डलेश्वर श्री महेश्वरानन्दगिरींच्या सान्निध्यात तीन वर्षं राहून हिन्दी आणि संस्कृतचा अभ्यास केला. १९६६ ई. मध्ये प्रयागांतील ( इलाहाबाद ) महाकुम्भमेळ्यात महामण्डलेश्वरापासून सन्यास-दीक्षा घेऊन 'स्वामी विद्यानन्द' ह्या नावांनी प्रसिद्धि मिळविली.

जेव्हां वीरकुमार सन्यास घेऊन पुन्हा हुबळीस परतले, तेव्हा लोक त्यांना कुमारस्वामी आणि कालान्तरानें शिवकुमारस्वामी म्हणू लागले. सध्या आपली प्रसिद्धि 'शिवकुमारस्वामी' ह्याच नावांने आहे.

जेव्हां स्वामीजीस संस्कृत आणि वेदान्ताचे उच्च अध्ययन करण्यासाठी काशीयात्रा करण्याची उत्कट इच्छा झाली, तेव्हा कमडोळ्ळीचे श्री वीरनगौड आणि इंगळगीचे श्री मुरिगेप्पा सिग्गावीं ह्या दोन्ही सद्गृहस्थांनी स्वामीजींच्या योगक्षेमाची सम्पूर्ण जबाबदारी घेतली आणि त्यांना काशीस पाठविले. काशीत आल्यानन्तर जंगमवाडीमठाचे श्री श्री श्री १००८ जगद्गुरु विश्वेश्वरशिवाचार्य महास्वामीजींची अनुज्ञा घेऊन जंगमवाडीमठाच्या छात्रावासात राहून श्री दक्षिणामूर्ति संस्कृत महाविद्यालयांत व्याकरण, न्याय, वेदान्त आदि शास्त्रांचे गहन अध्ययन करून वेदान्ताचार्य पदवी मिळविली. तसेच काशीविद्यापीठांतून तत्त्वशास्त्रविषयांत एम्. ए. उपाधि मिळविली.

अध्ययनावकाशप्रसंगी स्वामीजी शास्त्रप्रवचनासाठी कर्नाटकांत जात असत. एकदा आपल्या गांव पडनूरांत प्रवचन करीत असतांना बाळूर शिव-योगाश्रमाचे श्री गुण्डप्पा महाराज श्री स्वामीजींचे प्रवचन ऐकून अत्यन्त प्रभावित झाले, आणि पुन्हा दुसऱ्यांदा जेव्हां 'अगरखेड' येथे स्वामीजींचे प्रवचन झाले, तेव्हां श्री गुण्डप्पा महाराजांनी तेथील श्री सिद्धानन्दस्वामीजींची

सल्ला घेऊन आपल्या शिवयोगाश्रमाची चल-अचल समस्त सम्पत्तीचे मृत्युपत्र श्री शिवकुमारस्वामीजींच्या नावाने केले. कांहीं काळ लोटल्यानन्तर त्यांनी आपला देह त्यागला.

श्री शिवकुमारस्वामीजींने सन्यास घेतल्यानंतर त्यांची मातोश्री श्रीमती पार्वतम्माने आपले घर-दार सोडले आणि ती सुद्धा हुबळी सिद्धारूढमठ आणि बीजापुरांतील षण्मुखारूढमठांत कालयापन करू लागली. पुन्हा १९७५ ई. मध्ये आळूरच्या भक्तजनांची प्रार्थना ऐकून तेथील शिवयोगाश्रमाची व्यवस्था संभाळली, त्यामुळे दहा वर्षांत येथील फार उन्नति झाली.

श्रीमती पार्वतम्माच्या सदिच्छेने आम्हास दि. ११-८-१९८५ ते १८-८-८५ पावेतो अधिक श्रावणमासनिमित्त आळूर शिवयोगाश्रमांत साप्ताहिक शिवलिङ्गानुष्ठान करण्याचा सुअवसर मिळाला. त्यांत दि. १८-८-८५ रविवार रोजी अनुष्ठान समाप्ति ( पूर्णाहुति ) समारम्भ झाला. त्या प्रसंगी श्रीमती पार्वतम्माने ह्या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी ५००१ ( पांच हजार एक ) रुपयांची देणगी देऊन साहित्यक्षेत्राची अपूर्व सेवा केली आहे.

आम्ही भूतभावन श्री काशीविश्वनाथांच्या चरणीं ही प्रार्थना करतो की त्यांची आयुष्यवृद्धि व आरोग्यवृद्धि होत राहो व त्यांच्यापासून सदैव अशेच पुण्यकार्यं घडोत.

२. सौ. ताराबाई. सिद्रामप्पा. कलशेट्टी

ह्यांचा जन्म त्या कलशेट्टी घराण्यांत झाला, ज्या घराण्यांत श्री शिवलिंगप्पासारखे दानशूर जन्माला आले. सोलापुरमध्ये हे घराणे फार प्रसिद्ध आहे. ह्या घराण्यांत श्री सिद्रामप्पाप्रमाणेच श्री शिवलिंगप्पा ह्यांनी दानवीरता दाखवून आपले वडील श्री रेवणसिद्धप्पा ह्यांची कीर्ति अमर केली. ह्यांने दि. १४-११-७६ रोजी वीरशैव लिंगायत कलशेट्टी समाजास ६० X ३०

चौरस फुटाची जागा मंगलकार्यालयासाठी दान दिली आहे. तसेच सोलापुरचे शिवानुभव मंगलकार्यालयास १००१ रु. देणगी दिली आहे.

सौ. ताराबाई आपल्या परम्परेप्रमाणेच दानवीर आहेत. ह्यांनी दि. ७-२-७६ रोजी सोलापुरांत श्रीशैल सूर्यसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरु वागीशपण्डिताराध्यशिवाचार्य महास्वामीजींच्या सान्निध्यात झालेल्या "शिवप्पा बसप्पा लिंगशेट्टी मंगलकार्यालयाच्या" पायाभरणी सभारंभात सढळ हाताने ७०५१ रु. देणगी दिली. तसेच नंदगाव ( जि. उस्मानाबाद ) चे श्री. म. नि. प्र. राजशेखरस्वामीजींनी धर्मजागृतीसाठी ६३ गावांची जी पदयात्रा केली, त्यावर सन्तुष्ट होवून त्यांना ५००१ रु. दान दिले. इतकेच नव्हे, तर ह्यांनी महानगरपालिकेच्या प्राथमिक शाळेत इयत्ता ७वी परीक्षेत शीर्षस्थानावर आलेल्या दोन विद्यार्थ्यांना पारितोषिकें देण्यासाठी ५०१ रु. ठेवणी केली आहे, ज्याच्या व्याजानें ती दिली जातील.

महाराष्ट्रांत वीरशैव तत्त्वाचा खूप प्रचार व्हावा ही सौ. ताराबाईची उत्कट इच्छा आहे. यास्तव आमचे "वीरशैव अष्टावरण-विज्ञान" ह्या मूळ हिन्दी ग्रन्थाचे श्री कुमार कोठावळे ह्यांनी मराठीत भाषान्तर केले. ते पाहून सौ. ताराबाई अत्यन्त प्रसन्न झाल्या आणि त्यांनी त्याच्या प्रकाशनासाठी दि. १३-७-८५ रोजी त्या विराट् सभेमध्ये ५००१ रु. देणगी अत्यन्त भक्ति-पूर्वक समर्पित केली.

गुरु-लिंग-जंगमप्रेमी, सदाचारी आणि निष्ठावन्त सौ. ताराबाई शिक्षक-वृत्ती करून आता निवृत्त झाल्या आहेत. काशी विश्वेश्वर आणि सोलापुरचे ग्रामदेवता श्री सिद्धेश्वरांच्या चरणी आमची प्रार्थना आहे की त्यांना सदोदित आयुरारोग्यलाभ होत राहो. इति शिवम्.

---

# साभार निवेदन

"वीरशैव अष्टावरण-विज्ञान" नामक मूळ हिन्दी ग्रन्थाचे मराठी-संस्करण वाचकांच्या सम्मुख प्रस्तुत करतांना आम्हांस अपार हर्ष होत आहे. सोलापुर येथील भक्तांच्या साग्रह विनन्तीला मान देऊन हे भाषान्तर करण्यात आले आहे. हा एक विलक्षण योगच आहे.

भाषान्तराविषयीं—सोलापुर येथे १९८० ई. पासून दरवर्षी आषाढ महिन्यांत शिवानुभव मंगलभवनांमध्ये वीरशैव धर्मग्रन्थ "सिद्धान्तशिखामणि" आणि निजगुणयोगीविरचित "कैवल्यपद्धती" ह्या दोन ग्रन्थांवर येथील सामाजिक व धार्मिक कार्यकर्ते महाराष्ट्र वीरशैवसभेचे सेक्रेटरी आणि आमचे प्रियशिष्य वे. प. श्री बसवराजशास्त्री हिरेमठ ह्यांच्या संयोजकत्वात आमची प्रवचनें होतात.

ह्या वर्षी ही प्रवचनें ऐकण्यासाठी तेथील प्रसिद्ध लेखक आणि पत्रकार श्री कुमार कोठावळे आले होते. त्यांना आम्ही स्वरचित हिन्दी ग्रन्थ "वीरशैव अष्टावरण विज्ञाना"ची एक प्रत भेट केली व त्याचे मराठी भाषान्तर करण्याचा आग्रह केला. त्यांनी लगेच एका आठवड्याच्या आंतच त्याचे मराठी भाषान्तर करुन आम्हांस समर्पित केले. हा ईश्वरी संकेतच म्हणावा लागेल.

श्री कुमार कोठावळे—ह्यांचा जन्म १-७-१९२० ई. रोजी महाराष्ट्र प्रान्तांत वर्धा जिल्ह्यातील रसूलाबादमध्ये वीरशैव धर्मानुयायी एका अकिञ्चन परिवारात झाला. शिक्षणानन्तर ह्यांचे कार्यक्षेत्र सोलापुर झाले.

ह्यांनी महात्मा बसवेश्वर, पोटचा गोळा, मंगळसूत्र, माझे गांव माझी माणसें, शिंग फुंकिले रणीं आदि अनेक नाटकें, श्री शिवयोगी मन्मथस्वामी, पञ्चाक्षर विजय, कलामहर्षि माळगे, आचार्य विमलसागर वगैरे चरित्रपरक

ग्रन्थ, श्रीक्षेत्र वसवकल्याण ( हिन्दी-कन्नड ), लोकशाहीर रामजोशी, श्रीसिद्धरामेश्वर, महात्मा बसवेश्वर वगैरे शोधलेख, गीत बसवेश्वर, गीत-सिद्धेश्वर आदि अनेक खण्डकाव्यें आणि क्रान्तिवीर रत्नप्पा कुंभार, भगवान् महावीर ह्यावर अनेक पोवाडे लिहिले आहेत. ह्यांची ही साहित्यसेवा पाहून श्रीशैलजगद्गुरु महास्वामीजींनी ह्यांना 'साहित्यविशारद' ही उपाधि दिली. तसेच निडसोसी स्वामीजींनी 'वीरशैव-साहित्यरत्न' ही पदवी दिली. ह्यांनी महात्मा वसवेश्वराची कर्मभूमि 'कल्याण' ह्यांचे नवे नाव 'वसवकल्याण' सुचविले, ह्यास्तव 'वसवेश्वर देवस्थान पञ्चकमेटी'ने ह्यांना एक हजार रुपयांचे पारितोषिक दिले.

ह्या प्रमाणें साहित्यक्षेत्रात विख्यात श्री कोठावळे ह्यांनीं ह्या ग्रन्थाचे मराठी भाषान्तर करून महाराष्ट्रीय वीरशैव समाजावर आपला अत्यन्त अनुराग व्यक्त केला आहे. हे सतत अशेच मौलिक साहित्य-सृजन आणि भाषान्तरें करून साहित्य-सेवा करीत राहोत ही आमची शुभकामना आहे.

**अर्थसाहाय्य**—आमचे प्रियशिष्य श्री वे. वसवराजशास्त्रींच्या प्रेरणेने श्रीमतीपार्वतम्मा ( शिवयोगाश्रम, आळूर ) आणि सौ. तारावाई कलशेट्टी ( सोलापुर ) ह्या दोन भाविकांच्या आर्थिक साहाय्यामुळेच हा ग्रन्थ छापून आपल्यासमक्ष ठेवण्यात येत आहे.

**शुभाशीर्वाद**—मूळ हिन्दी ग्रन्थाचे हे मराठी भाषान्तर पाहून श्रीकाशी-ज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरु विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी फार प्रसन्न झाले आणि त्यांनी आपली शुभाशीर्वचनें ह्या ग्रन्थासाठी लिहिली हे माझे सौभाग्यच आहे. त्यांच्या पुनीत चरणीं शतश: प्रणामपूर्वक हे ग्रन्थ-पुष्प सादर समर्पित करणें मी आपले पुनीत कर्तव्य समजतो.

**अनेक आभार**—ह्या ग्रन्थ-निर्मितींत मी अत्यन्त प्राचीन आगमशास्त्रीय ग्रन्थापासून आधुनिक साहित्यिक ग्रन्थांची सहायता घेतली. त्या सर्व ग्रन्थ-कारांच्या प्रति मी आपली भक्तिसुमनें श्रद्धापूर्वक समर्पित करीत आहे.

आमच्या मूळ हिन्दी ग्रन्थावर आपले विद्वत्तापूर्ण अभिप्राय व्यक्त करुन ह्या ग्रन्थाची गरिमा ज्या विद्वानांने वाढविली, त्यांत सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालय ( वाराणसी ) चे कुलपति डॉ. रामकरण शर्मा, तेथील वेदान्त-विभागाध्यक्ष पण्डित देवस्वरूप मिश्र आणि सांख्ययोगतन्त्रागम विभागाचे "शास्त्रचूडामणि" प्राचार्य पं. श्री व्रजवल्लभ द्विवेदी अग्रगण्य आहेत. ह्या सर्वांना माझा सादर साधुवाद.

सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालय ( वाराणसी ) चे सांख्ययोगतन्त्रागम-विभागीय पं. श्री जगन्नाथशास्त्री तैलङ्ग ह्यांनी ह्या मराठी-संस्करणाच्या मुद्रणासाठी आपले अमूल्य साहाय्य व सल्ला दिली आहे. तसेच श्री नरहरि पुरुषोत्तम रंगप्पा ( वाराणसी ) ह्यांनी अत्यंत निष्ठापूर्वक मुद्रण-संशोधन केले आहे. मराठी संस्करणाचे सर्वांगसुन्दर मुद्रण आर्यभूषण प्रेस ( वाराणसी ) चे सञ्चालक श्री गोडसेबन्धु आणि त्यांचे निष्ठावन्त कामगार ह्यांच्या मदतीमुळेच शक्य झाले. ह्या सर्वांच्या प्रति मी आपली कृतज्ञता व्यक्त करतो.

शेवटी बहुविध कार्यांत सहयोग देणारे, शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तदर्शन शिकणारे प्रिय शिष्य चि. पण्डिताराध्य हिरेमठ मुत्तगी ह्यांच्या उज्ज्वल भविष्याची मी कामना करतो.

---

# संकेतसूची

अनु. सू. = अनुभवसूत्र
ई. उ. = ईशावास्योपनिषद्
कठ. उ. = कठोपनिषद्
का. रुद्रोपनिषद् = कालाग्निरुद्रोपनिषद्
चन्द्र.
चन्द्र. आ. } चन्द्रज्ञानागम
च. आ.
छा. = छान्दोग्योपनिषद्
पा. आ = पारमेश्वरागम
पा. त. = पारमेश्वरतन्त्र
पाणि. सू. = पाणिनीयसूत्रपाठ
ब. व. = बसवेश्वर के वचन
बृ. जा. उ.
बृ. जाबालोपनिषद् } बृहज्जाबालोपनिषद्
बृ. उ.
बृहदारण्यको. } बृहदारण्यकोपनिषद्
ब्र. सू. = ब्रह्मसूत्र
ब्र. सू. श्रीकर. = ब्रह्मसूत्रश्रीकरभाष्य
मनु. स्मृ. = मनुस्मृति
मुण्डको. = मुण्डकोपनिषद्
यो. सू. = योगसूत्र
वी. आ. च. = वीरशैवानन्दचन्द्रिका
वी. धर्म. शिरो. = वीरशैवधर्मशिरोमणि,

वी. चि. = वीरशैवचिन्तामणि
वी. स. सं. = वीरशैवसदाचारसंग्रह
वे. वी. चि. = वेदान्तसारवीरशैवचिन्तामणि
शिव. पु. = शिवमहापुराण
शै. र. = शैवरत्नाकर
सि. शि. = सिद्धान्तशिखामणि
सू. आ. = सूक्ष्मागम
स्कन्द. = स्कन्दपुराण

---

## विषय-सूची

---

# उपोद्घात

भारत देशात निगम आणि आगमाच्या भेदाने दोन शास्त्रें अत्यन्त प्रसिद्ध आहेत. हीं दोन्ही परस्पर प्रतिद्वन्द्वी नाहींत. यांत शिवाच्या निःश्वासाने निःसृत निगम आहेत आणि त्यांचेच वाग्व्यवहाररूप आगम आहेत. म्हणून, "निश्चयेन तत्त्वं गमयतीति निगमः" ही निगमांची व "आप्तवचनादाविर्भूतमर्थ-विशेषसंवेदनमागमः" ही आगमांची व्युत्पत्ति होय. अगाध ज्ञानभाण्डाररूपी निगमांत परस्परविरुद्ध मंत्र असल्यामुळें षड्लिंगाशिवाय त्यांच्या तात्पर्याचा बोध होत नाहीं. सामान्य जनांसाठी निगमांचा उपयोग होऊ शकत नाहीं. म्हणून सर्वजनांच्या उपयोगितेच्या दृष्टीने भगवान् शंकरांनी देवी पार्वतीला आगमांचा उपदेश केला आहे. म्हणून म्हटलें आहे—

आगतं शिववक्त्रात्तु गतं च गिरिजामुखे ।
मतं श्रीवासुदेवेन आगमस्तेन कीर्तितः ॥

( भास्करी, द्वि. भाग, पृ. ८५ )

हा आगम शब्दाचा रूढ अर्थ आहे. याचा यौगिक अर्थ—"आसमन्ताद् अर्थं गमयतीति आगमः" या व्युत्पत्तीच्या आधारावर सम्पूर्ण तत्त्वांचा बोध करणारा असतो. श्री वाचस्पति मिश्र यांनी "आगच्छन्ति बुद्धिमारोहन्ति यस्माद् अभ्युदय-निःश्रेयसोपायाः स आगमः" ( यो. सू. १।२५ तत्त्ववैशारदी ) ही आगम शब्दाची व्युत्पत्ति दाखविली आहे.

आगमाचेच दुसरे नाव 'तन्त्र' आहे. "तन्यते विस्तार्यते–ज्ञानमनेन." ज्याच्या अध्ययनाने ज्ञानाचीं वृद्धि होते, त्याला तन्त्र म्हणतात. हा तन्त्र शब्दाचा यौगिक अर्थ. हाच भाव कामिक आगमाच्या पुढील वचनात स्पष्ट होतो.

तनोति विपुलानर्थान् तन्त्रमन्त्रसमन्वितान् ।
त्राणं च कुरुते यस्मात् तन्त्रमित्यभिधीयते ॥

**तन्त्रांचे भेद**

तन्त्रांचे ब्राह्मणतन्त्र, बौद्धतन्त्र आणि जैनतन्त्र असे तीन भेद आहेत. यांत ब्राह्मणतन्त्र उपास्यदेवतांच्या भेदामुळे शैव, वैष्णव आणि शाक्त या नावांचे तीन प्रकार झाले आहेत. वैष्णवागम ( पांचरात्रागम ) विशिष्टाद्वैताचें प्रतिपादन करतात. शाक्तागम अद्वैत प्रतिपादन करतात. शैवागम तर द्वैत, अद्वैत, द्वैताद्वैत, विशिष्टाद्वैत आणि शक्तिविशिष्टाद्वैत सिद्धान्तांचे प्रतिपादक आहेत. शैवागम प्रतिपाद्य पाशुपतशैव आणि सिद्धान्तशैव या दोन्ही द्वैत सिद्धान्तांना, प्रत्यभिज्ञादर्शन ( काश्मीर शैवदर्शन ), अद्वैत सिद्धांतास, लकुलीशपाशुपतमत, द्वैताद्वैतास, श्रीकण्ठ यांचे शैवदर्शन शैवविशिष्टाद्वैतास आणि वीरशैवदर्शन शक्तिविशिष्टाद्वैत सिद्धान्त मानतात.

**शैवागम ( सिद्धान्तागम )**

भगवान् शिवांनी प्रतिपादन केलेले कामिकापासून वातुलापर्यंन्त अठ्ठावीस आगम शैवागम मानले जातात यांना सिद्धान्तागमही म्हणतात. "आप्तोक्तिरत्र सिद्धान्तः शिव एवाप्तिमान् यतः" श्रीकंठ सूरींच्या या वचनाच्या व्याख्यानाच्या वेळी श्री अघोरशिवाचार्यांनी "सिद्धान्तशब्दः पङ्कजादिशब्दवद्योगरूढ्या शिवप्रणीतेषु कामिकादिषु दशाष्टादशतन्त्रेषु प्रसिद्धः" ( रत्नत्रय, पृ. ५ ). अशा प्रकारें शिवप्रणीत अठ्ठावीस आगमांसाठी सिद्धान्त शब्द वापरला आहे. हे अठ्ठावीस आगम पुढीलप्रमाणें आहेत—

कामिकं योगजं चिन्त्यं कारणं त्वजितं तथा ।
दीप्तं सूक्ष्मं सहस्रं च अंशुमान् सुप्रभेदकम् ।।
विजयं चैव निश्वासं स्वायम्भुवमथानिलम् ।
वीरं च रौरवं चैव मुकुटं विमलं तथा ।।
चन्द्रज्ञानं च बिम्बं च प्रोद्गीतं ललितं तथा ।
सिद्धं सन्तानशर्वोक्तं पारमेश्वरमेव च ।।
किरणं वातुलं चैव अष्टाविंशतिसंख्यया ।।

( क्रियासार, भाग १, पृ. ९ )

यापैकीं पहिले दहा आगम शिवाशी उपदिष्ट असल्यामुळें; 'शैवागम' आणि बाकीचे अठरा आगम श्री रुद्राद्वारें उपदिष्ट असल्यामुळें 'रुद्रागम' या नावाने प्रसिद्ध आहेत.

**वीरशैवदर्शनाचें आगममूलकत्व**

शैवतन्त्रमिति प्रोक्तं सिद्धान्ताख्यं शिवोदितम् ।
सर्ववेदार्थरूपत्वात् प्रामाण्यं वेदवत् सदा ॥
वेदधर्माभिधायित्वात् सिद्धान्ताख्यः शिवागमः ।
वेदबाह्यविरोधित्वाद् वेदसम्मत उच्यते ॥
वेदसिद्धान्तयोरैक्यमेकार्थप्रतिपादनात् ।
प्रामाण्यं सदृशं ज्ञेयं पण्डितैरेतयोः सदा ॥
सिद्धान्ताख्ये महातन्त्रे कामिकाद्ये शिवोदिते ।
निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैवमतं परम् ॥

( सि. शि. ५।८, १२–१४ )

महर्षि अगस्त्यांना श्री ज. रेणुकाचार्यांनी उपदेशिलेल्या सिद्धान्तशिखामणीच्या उपर्युक्त वचनात वेदोक्त भस्म, लिंग, रुद्राक्षधारण आदि सिद्धान्तांचें प्रतिपादन केल्यामुळें तथा वेदबाह्य चार्वाक, जैन, बौद्ध आदि सिद्धान्तांचे निराकरण केल्यामुळें सिद्धान्ताख्य जो शिवागम आहे, त्याला वेदसम्मत दर्शविले आहे. वेदसम्मत अशा या सिद्धान्त शिवागमाच्या उत्तरभागात वीरशैवसिद्धान्त प्रतिपादित आहे. अतः आगमशास्त्र याचें मूळ मानलें जातें. म्हणूनच पारमेश्वरतन्त्राच्या—

वीरशैवं वैष्णवं च शाक्तं सौरं विनायकम् ।
कापालमिति विज्ञेयं दर्शनानि षडेव हि ॥

( १।२२-२३ )

ह्या वचनात आगमसम्मत षड्दर्शनांच्या गणनेंत वीरशैवाची गणना केली आहे. त्याच पारमेश्वरतन्त्रात—

न वीरशैवसदृशं मतमस्ति जगत्त्रये ।
सर्वभोगप्रदं पुण्यं शिवसायुज्यदायकम् ॥
( ११४२ )

याप्रमाणें ह्या मताची सर्वोत्कृष्टता दाखविण्यात आली आहे.

### वीरशैव शब्दाचे दार्शनिक निर्वचन

वीरशैव केवळ धर्म नव्हे आणि दर्शनही नव्हे तर उभयरूप आहे. अतः याचे निर्वचनही दोन प्रकारें केलें जातें. आम्हीं प्रथम दार्शनिक विवेचन करीत आहोंत—

वीशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका ।
तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः ॥
विद्यायां शिवरूपायां विशेषाद्रमणं यतः ।
तस्मादेते महाभागा वीरशैवा इति स्मृताः ॥
वेदान्तजन्यं यज्ज्ञानं विद्येति परिकीर्त्यते ।
विद्यायां रमते तस्यां वीर इत्यभिधीयते ॥
( सि. शि. ५।१५-१६, १८, पृ. ५७-५८ )

श्री ज. रेणुकाचार्यांच्या या उक्तीत वीरशैव शब्दाचें दार्शनिक निर्वचन केलें आहे. याचें तात्पर्य हें आहे—पाणिनीय धातुपाठांत "वी गतिव्याप्ति-प्रजननकान्त्यसनखादनेषु" ( अदादि. ११३३ ) या प्रकारें गत्यर्थ 'वी' धातु आहे. "ये गत्यर्थकास्ते ज्ञानार्थकाः" या नियमानुसार गत्यर्थक 'वी' धातूचा 'ज्ञान' अथवा 'विद्या' असा अर्थ होतो. 'र' शब्दाचा अर्थ रमण आहे. अशा प्रकारें 'वी' शब्दानें प्रतिपाद्य अशी जी शिव आणि जीवाच्या अभेदाचा बोध करणारी विद्या आहे, तिच्यात रमणारे शिवभक्तच वीरशैव म्हणवतात.

### श्री एस्. एन्. दासगुप्त यांच्या आक्षेपांचा परिहार

श्री एस्. एन्. दासगुप्त हे सिद्धान्तशिखामणीमध्यें प्रतिपादित वीरशैव शब्दाच्या दार्शनिक निर्वचनाच्या बाबतीत पुढीलप्रमाणें आक्षेप घेतात—

"The Siddhanta-Śikhamani gives a fanciful interpretation of word, "Vira"—as being composed of 'Vi' meaning knowledge of identity with Brahman, and 'ra' as meaning someone who takes pleasure in such knowledge. But such an etymology, accepting it to be correct, would give the form "Vira" and not "Vira". No explanation is given as how 'Vi' standing for 'Vidya', would lengthen its vowel into 'Vi'. I therefore find it difficult to accept this etymological interpretation as justifying the application of the word "Vira" to Vira-Śaiva. Moreover, most systems of Vedāntic thought could be called Vira in such an interpretation, for most types of Vedānta would feel enjoyment and bliss in true knowledge of identity. The word 'Vira' would thus not be a distinctive mark by which we could distinguish Vira-Śaivas from the adherents of other religions. Most of the Agamic Śaivas also would believe in the ultimate identity of individuals with Brahman or Śiva."

( A History of Indian Philosophy, Vol. V, pp. 44-45 )

आक्षेपाचा भाव असा आहे कीं सिद्धान्तशिखामणीत प्रतिपादिलेल्या वीरशैव शब्दामध्यें जो 'वीर' शब्द आहे, त्याची व्युत्पत्ति मोठ्या विचित्र-प्रकारें केली गेली आहे. जर "विद्यायां रमते" अशी व्युत्पत्ति केली तर त्यापासून उत्पन्न शब्द 'विर' होईल. 'वीर' होणार नाहीं. ह्रस्व 'वि' दीर्घ 'वी' मध्यें कसा परावर्तित झाला ?

दुसरा प्रश्न असा आहे कीं, शिव आणि जीव या दोन्हींचे ऐक्यबोधन करणाऱ्या तत्त्वज्ञानरूप विद्येत अद्वैत वेदान्ती व अद्वैतास मानणारे कांही शैव संप्रदायाचे लोकही 'रमण' करण्याच्या कारणानें "विद्यायां रमते" या व्युत्पत्ति-सिद्ध वीर विशेषणानें युक्त होतात. त्यांच्याकडून वीरशैवांची व्यावृत्ति कशी होईल ? त्याप्रकारें विद्येत रमण करणाऱ्या सर्व लोकांत त्या विशेषणाचें

असणें अनिवार्य आहे. "व्यावृत्तिर्व्यवहारो वा लक्षणस्य प्रयोजनम्" या नियमाची सार्थकता येथें होऊ शकत नाही.

श्री एस्. एन्. दासगुप्ता यांचा हा आक्षेप अविचारितरमणीय आहे. सिद्धान्तशिखामणीत "वीशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका" इति विद्यावाचक शब्दास 'वी' म्हटलें आहे. 'वि' ला नव्हे. अतः ऱ्हस्व 'वि' दीर्घ 'वी' कसा झाला ? या आक्षेपास मुळीं अवसरच नाहीं. "विद्यायां रमते इति वीरः" अशा प्रकारें वीर शब्दास व्युत्पत्तिसिद्ध प्रातिपदिक मानल्यावरसुद्धां दीर्घत्वात कोणतीही बाधा येत नाहीं. "ईर् गतौ कम्पने च" ( अदादि १०८८ ) या धातुचा "ईर्ते गच्छति प्रवृत्तो भवति" या व्युत्पत्तीनें 'विर्' हें रूप सिद्ध होतें. त्यानंतर "अन्येष्वपि दृश्यते" ( पाणि. सू. ३।२।१०१ ) या सूत्रानें डप्रत्यय होऊन 'विर' बनतो. "व्यत्ययो बहुलम्" ( पाणि. सू. ३।१।८५ ) या सूत्रानें दीर्घ होऊन 'वीर' हा शब्द निष्पन्न होतो. असें त्यांच्या पहिल्या आक्षेपाचें समाधान आहे.

त्यांच्या दुसऱ्या आक्षेपाचें तात्पर्य हें आहे कीं, शिव आणि जीव यांचा अभेदबोधन करणाऱ्या विद्येत रमण, अद्वैतवेदान्ती आणि अद्वैत मानणारे शैव सम्प्रदायाचे अन्य लोकसुद्धां करतात. अतः वीरशैव शब्दाची त्यांच्यामध्यें अतिव्याप्ति होऊन जाते. तिला इष्टापत्तीही म्हणतां येत नाहीं. कारण ते लोक स्वतःला वीरशैव म्हणवीत नाहींत. असाधारण धर्मासच लक्षण म्हणतात. तो अव्याप्ति, अतिव्याप्ति आणि असम्भव या तिन्ही दोषांपासून रहित असला पाहिजे. अशा प्रकारच्या निर्दुष्ट लक्षणांनीच लक्ष्य जाणलें जाऊं शकतें. अतः "शिव आणि जीव यांच्या अभेदबोधक विद्येत रममाण होणारे शैवच, अर्थात् शिवभक्तच वीरशैव होत." हें लक्षण वीरशैवेतर शैवसम्प्रदायाच्या लोकांत अतिव्याप्त असल्यामुळें वीरशैवांचे असाधारण लक्षण होऊ शकत नाहीं.

श्री दासगुप्ता यांचा हा आक्षेप आपाततः सुचारु प्रतीत होतो. अथवा विचारानेच त्याचे निराकरण होऊन जाते. येथें ते रहस्य आहे—"अथाऽतो ब्रह्मजिज्ञासा" ( ब्र. सू. १।१।१ ) या सूत्राचें भाष्य लिंहितांना श्रीपति-

पंडिताराध्यांनी, "कल्याणकैवल्यविभूतित्रयप्रदायकाष्टावरण-पञ्चाचार-सद्गुरु-करुणाकटाक्षलब्धशक्तिपाताद्यवच्छिन्नपरशिवस्येष्टलिङ्गधारणात्मकपाशुपतदीक्षाऽनन्तर्यमित्यथशब्दार्थो निर्णीयते" असें म्हटलें आहे. येथें 'अथ' शब्दाचा अर्थ, सद्गुरुकृपेने दीक्षेद्वारें प्राप्त इष्टलिंगधारणेनंतर ब्रह्मजिज्ञासा केली पाहिजे, असा केला आहे. वेदान्तशास्त्रात ज्याप्रमाणें विवेक, वैराग्य, शमादिषट्क सम्पत्ति आणि मुमुक्षुतारूप साधनचतुष्टयाच्या प्राप्तीनंतर ब्रह्मजिज्ञासेचा अधिकार मानला जातो, तद्वतच वीरशैव सिद्धान्तात त्रिविध दीक्षाद्वारें ज्याचे मलत्रय निवृत्त झाले आहेत, ज्याने सदा इष्टलिंगास शास्त्रविहित पद्धतीने शरीरावर धारण केले आहे, जो अष्टावरणात निष्ठा ठेवून पंचाचारात परायण आहे, तोच ब्रह्मजिज्ञासेचा अधिकारी मानला जातो. याचा निष्कर्ष हाच कीं, सद्गुरुकडून दीक्षेमध्यें प्राप्त झालेलें इष्टलिंग शरीरावर धारण करून जो शिव-जीवाचा अभेदबोधन करणाऱ्या विद्येत रमण करतो, असा शिवभक्तच वीरशैव म्हणविला जातो. पूर्वोक्त वेदान्ती अथवा शैव लोक इष्टलिंग धारण करीत नाहीत. अतः त्यांच्यामध्यें हें लक्षण अतिव्याप्त नसतें.

अशाप्रकारें वीरशैव शब्दास योगरूढ समजलें पाहिजे. "अन्यद्धि शब्दानां व्युत्पत्तिनिमित्तमन्यद्धि प्रवृत्तिनिमित्तम्" या न्यायाने व्युत्पत्तिलभ्य अर्थाची कथञ्चित् अन्यनिष्ठ असण्याची शंका येऊनही वीरशैवसिद्धान्तप्रतिपादित इष्टलिंगधारणरूप साधनविशेषाने विशिष्ट साधकांत तो रूढ मानला गेला आहे. अतः श्री दासगुप्तद्वारा प्रतिपादित अतिव्याप्तिरूप आक्षेपाला मुळींच अवसर नाहीं.

**वीरशैवशब्दाचें धार्मिक निर्वचन**

वीरशैव धर्मात श्रीसद्गुरु दीक्षेच्या द्वारें इष्टलिंग प्रदान करून तें यावज्जीव शरीरावर धारण करण्याचा आदेश देतांना म्हणतात—

प्राणवद्धारणीयं तत्प्राणलिङ्गमिदं तव ।
कदाचित् कुत्रचिद्वापि न वियोजय देहतः ॥

(सि. शि. ६।५, पृ. ९०)

हे शिष्या, तुला जें इष्टलिंग दिले गेले आहे, त्याला तू प्राणलिंग समज. ज्याप्रमाणे तू स्वतःच्या प्राणावर प्रेम करतोस, तसेंच या शिवलिंगावर प्रेम कर. कोणत्याहि परिस्थितीत याचा आपल्या शरीरापासून वियोग होऊ देऊ नकोस.

जी व्यक्ती, गुरुच्या या आदेशानुसार अत्यंत सावधानतेने आचरण करीत कदाचित् प्रमादानें इष्टलिंगाचा शरीरापासून वियोग झाल्यानंतर प्राण त्यागण्याच्या वीरव्रताचे परिपालन करते, असा वीरव्रतधारी शिवभक्तच वीरशैव म्हणविला जातो. हाच भाव—

इष्टलिङ्गवियोगे वा व्रतानां वा परिच्युतौ ।
तृणवत् प्राणसन्त्याग इति वीरव्रतं मतम् ॥
भक्त्युत्साहविशेषोऽपि वीरत्वमिति कथ्यते ।
वीरव्रतसमायोगाद् वीरशैवं प्रकीर्तितम् ॥

( चन्द्र, आ. क्रियापाद, १०।३३-३४ )

आगमाच्या या वचनात हें स्पष्टपणें सांगितले आहे. म्हणून "वीरश्चासौ शैवश्च वीरशैवः" या व्युत्पत्तिद्वारें या लोकांमध्यें शिवाप्रत असणाऱ्या भक्तीच्या पराकाष्ठेचें प्रतिपादन केलें जातें. येथें जें वीरत्व सांगितले आहे, तें शारीरिक बलप्रयुक्त नव्हे, तर भक्त्युत्साहप्रयुक्त समजलें पाहिजे. षडक्षरमन्त्री म्हणतात—

वीरत्वमस्य न धनेन न वा बलेन
नो कार्यतश्च विहितं दृढशम्भुभक्त्या ।
वीरस्तुरीय इति शङ्करभाषणेन
श्रीवीरशैवमतगान्न परोऽस्ति कश्चित् ॥

( वी. धर्म. शिरो. १।१६ )

युद्धभूमीवर युद्ध करणारा योद्धा आपल्या स्वामीच्या ठिकाणीं अत्यंत श्रद्धा ठेवून, त्याच्यासाठी आपल्या प्राणाचाहि त्याग करतो, तद्वतच शिवामध्यें भक्ति ठेवणारा हा भक्त आपल्या शरीरात असलेली ममत्वबुद्धी त्यागून प्रसंगवशात्

भगवान् शिवासाठी विकल्परहित होऊन आपल्या प्राणाचाहि त्याग करतो. नीलकंठशिवाचार्य म्हणतात—

विशब्दो वा विकल्पार्थो रशब्दो रहितार्थकः ।
विकल्परहितं शैवं वीरशैवं प्रचक्षते ॥ इति ॥

( क्रियासार, भाग १, पृ. ११ )

स्कन्दपुराणातील शंकरसंहितेच्या—

यो हस्तपीठे निजमिष्टलिङ्गं
विन्यस्य तल्लीनमनःप्रचारः ।
बाह्यक्रियासङ्कुलनिस्पृहात्मा
सम्पूजयत्यङ्ग स वीरशैवः ॥

या श्लोकात करपीठावर इष्टलिंगार्चनाचा विधी संपन्न करून, त्याप्रकारच्या अर्चनेत अनुरक्त असलेल्या व्यक्तीसच वीरशैव संज्ञा दिली गेली आहे. यावरून वीरशैवांचें हें इष्टलिंगार्चन किती प्राचीन कालापासून चालत आलें आहे, याचें ज्ञान आम्हांस होतें.

अशाप्रकारें इष्टलिंग धारण करणारा हा शिवभक्त आपल्या लौकिक व पारमार्थिक व्यवहारात अन्य सर्व लोकांहून अत्यंत विलक्षण रूपानें प्रतीत होतो. या विलक्षण आचारामुळेंही यांना वीरशैव म्हटलें जातें.

वातुलशुद्धाख्यतन्त्रात—

विशिष्ट ईर्यते यस्माद् वीर इत्यभिधीयते ।
शिवेन सह सम्बन्धं शैवमित्यादृतं बुधैः ॥
उभयोः सम्पुटीभावाद् वीरशैवमिति स्मृतम् ।
शिवायार्पितजीवत्वाद् वीरतन्त्रसमुद्भवात् ॥
वीरशैवसमायोगाद् वीरशैवमिति स्मृतम् ।

( १०।२७–२९ )

या वचनात "विशिष्ट ईर्यंत इति वीरः" अशी वीर शब्दाची व्युत्पत्ति दाखवून, त्या विशिष्ट आचारसंपन्न शैवास वीरशैव म्हटलें गेलें आहे.

श्री नीलकंठशिवाचार्यांनी क्रियासारांत—

विरोधार्थो विशब्दः स्याद् रशब्दो रहितार्थकः ।
विरोधरहितं शैवं वीरशैवं विदुर्बुधाः ॥

( भा. १, पृ. ११ )

या वचनात वीरशैव शब्दाची व्युत्पत्ति 'विरोधरहित' या अर्थी दर्शवून वीरशैवांचें सर्वलोकानुरागित्व सिद्ध केलें आहे. यावरून हें दिसून येतें कीं, वीरशैव लोक प्राणीमात्रांच्या ठायींसुद्धा अनुराग करीत आले आहेत, आणि पुढेंहि करतील.

उपर्युक्त विवेचनावरून हें सिद्ध होतें कीं सद्गुरुकडून दीक्षेंत प्राप्त झालेल्या इष्टलिंगास आपल्या शरीरापासून कदापि विलग न करतां जो सावधानतेनें धारण करतो, आणि प्रसंगोपात् भगवान् शिवासाठीं प्राणत्याग करण्यासहि तत्पर राहतो, आणि जो विरोधभावनेचा सर्वथा त्याग करून सर्व प्राणिमात्रांवर सदैव प्रेम करतो, तोच वीरशैव होय.

**लिंगायत शब्दाची व्याख्या**

लिंगायत शब्द 'वीरशैव'चाच पर्यायवाचक आहे. "लिङ्गमायतिर्यस्य स लिङ्गायतः" ही याची व्युत्पत्ति आहे. "उत्तरः काल आयतिः" या अमरसिंहाच्या उक्तीत उत्तरकालास 'आयति' म्हटलें आहे. ज्याच्या जीवनाचा उत्तरकाल लिंगच आहे, तो लिंगायत म्हणविला जातो. शिवदीक्षेनंतर ज्याच्या जीवनाचा उत्तरकाल; अर्थात् अवशिष्ट आयुष्य अधिकतर शिवलिंगाची पूजा, ध्यान वादीमध्यें व्यतीत होतो, तोच लिंगायत होय.

महर्षि वेदव्यास यांनी—

शैलादेन महाभागा विचित्रा लिङ्गधारकाः ।
शवस्योपरि लिङ्गं च ध्रियते च पुरातनैः ॥
लिङ्गेन सह पञ्चत्वं लिङ्गेन सह जीवनम् ॥

( स्कन्द. केदारखण्ड, ७।४१-४२ )

स्कन्दपुराणाच्या या वचनात लिंगायत पर्यायनामधारी वीरशैवांची शिवलिंगनिष्ठा सुंदर प्रकारानें चित्रित केली आहे.

**वीरशैवांचे प्रभेद**

वीतरागादिदोषत्वादात्मतत्त्वविचारणात् ।
विकल्पाकल्पशून्यत्वाद्वीरशैवमिति स्मृतम् ॥
सामान्यं प्रथमं प्रोक्तं विशेषं च द्वितीयकम् ।
निराभारं तृतीयं स्यात् क्रमाल्लक्षणमुच्यते ॥
( सूक्ष्मागम. क्रियापाद, ७।२९-३० )

सूक्ष्मागमाच्या या प्रमाणवचनांत सामान्य, विशेष आणि निराभार असे वीरशैवांचे तीन भेद दाखविले आहेत. हे तिन्ही भेद त्यांची क्रमानें उन्नति दर्शवितात. यांच्यामध्यें "सामान्यनियमान् यः परिपालयति सः सामान्य-वीरशैवः" या वचनानुसार जो गुरुदीक्षेनंतर नियमानें इष्टलिंगाची पूजा, पूजनीय गुरु व जंगमांची सेवा आदि वीरशैवीय सामान्य नियमांचे पालन करतो, त्याला सामान्य वीरशैव म्हणतात.

"विशिष्टधर्मानुष्ठानाद्विशेष इति कथ्यते" या आगमोक्त्यनुसार जो पूर्वोक्त सामान्य नियमांचे परिपालन करून पवित्रमनस्क होऊन वीरशैवोक्त भक्त, महेश, प्रसादी, प्राणलिंगी, शरण व ऐक्यनामक मुक्तीच्या क्रमिक सोपानांच्या स्वरूपात विद्यमान असलेल्या षट्स्थल तत्त्वांची गुरुमुखानें विशेष माहिती करून घेतो त्याला विशेष वीरशैव म्हणतात.

"निवृत्तकर्मभारत्वान्निराभार इति स्मृतः" आगमाच्या या वचनानुसार उपर्युक्त विशेष वीरशैव जेव्हां आपलीं सर्व कर्तव्यें पूर्ण करून कृतकृत्य होऊन जीवन्मुक्ताप्रमाणे निःस्पृह वृत्तीनें जीवन व्यतीत करतो, तेव्हां त्याला निराभार वीरशैव म्हणतात. याप्रमाणें हे त्रिविध भेद व्यक्तींच्या क्रमिक आध्यात्मिक विकासाचा परिचय देणारे आहेत.

**वीरशैवांचा दार्शनिक सिद्धान्त**

न वीरशैवसदृशं मतमस्ति जगत्त्रये ।
सर्वभोगप्रदं पुण्यं शिवसायुज्यदायकम् ॥
( पा. आ. १।४२ )

पारमेश्वर आगमाच्या या वचनानुसार परमपावन वीरशैव धर्माचा दार्शनिक सिद्धान्त 'विशेषाद्वैत', 'शिवाद्वैत' आणि 'शक्तिविशिष्टाद्वैत' आदि सार्थ नावांनी ओळखला जातो. या नावांचे व्युत्पत्तिपूर्वक विश्लेषण केल्याने त्यांचे दार्शनिक तत्त्व प्रकट होतें.

१. विशेषाद्वैत

"विश्च शेषश्च विशेषौ ईशजीवौ, तयोरद्वैतं विशेषाद्वैतम्" ही विशेषाद्वैत शब्दाची व्युत्पत्ति आहे. हिचे तात्पर्य हें आहे कीं, "विश्चक्षुषि व्योम्नि वाते परमात्मनि पक्षिणि" ( एकाक्षरकोष, पृ. १८ ) निघण्टुच्या या वचनानें 'वि' शब्दाचा अर्थ परमात्माहि होतो. "वाति उत्पादयति जगदिति विः" या व्युत्पत्तीने 'वि' शब्दाने जगाला कारणीभूत असलेला ईश्वर सिद्ध होतो. जरी अमरकोषांत 'वि'चा अर्थ पक्षी दाखविला गेला आहे, तथापि "द्वा सुपर्णा सयुजा सखाया" ( मुण्डको. ३।१।१ ) मुण्डकाच्या या वचनात परमात्म्याचें पक्षाच्या रूपांतहि वर्णन केले गेले आहे. अतः प्रकृतमध्यें 'वि'चा अर्थ परमात्माच घेतला पाहिजे. शेष शब्दानें त्याचा अंशरूप जीवात्मा अभिप्रेत आहे. "यथाऽग्नेः क्षुद्रा विस्फुलिङ्गाः" ( बृहदारण्यको. २।१।२० ) या श्रुतीत अग्निकणाच्या दृष्टान्ताने जीवात्म्यास परमात्म्याचाच अंश असें सिद्ध केले आहे. अशा प्रकारें अंशाशीभावाने सिद्ध जीव व परमात्मा यांच्यामध्यें "यथा नद्यः स्यन्दमानाः" ( मुण्डको. ३।२।८ ) ही श्रुति अद्वैताचें बोधन करविते. संसारदशेत अत्यन्त भिन्नस्वरूपी शिव आणि जीव यांच्या मुक्तावस्थेंत अभेद स्थिती प्रतिपादन करणाऱ्या या सिद्धान्तास विशेषाद्वैत या नावानें ओळखलें जाते.

विशब्देनोच्यते शम्भुर्हंसहंसेति मन्त्रतः ।
शेषशब्देन शारीरो यथाग्नेरिति मन्त्रतः ॥
अद्वैतेन भवेद्योगो यथा नद्य इति श्रुतेः ।

( श्रीकरभाष्य, मंगलश्लो. १६ )

या श्लोकात भगवान् भाष्यकार श्रीपतिपण्डिताराध्य यांनीं विशेषाद्वैताचें तात्पर्य संक्षेपात सांगितलें आहे.

२. शिवाद्वैत

"शिवश्च शिवश्च शिवौ, तयोरद्वैतं शिवाद्वैतम्" ही या शब्दाची व्युत्पत्ति आहे. पहिल्या शिवशब्दानें परमात्मा अभिप्रेत आहे; आणि दुसऱ्या शिवशब्दानें त्याचाच अंशभूत जीवात्मा प्रतिपाद्य आहे. संसारदशेत उपास्य आणि उपासकाच्या रूपांत विद्यमान असलेल्या या दोहोंचा मुक्तावस्थेंत अद्वैत स्थिती दाखविणारा सिद्धान्तच शिवाद्वैत सिद्धान्त होय.

३. शक्तिविशिष्टाद्वैत

"शक्तिश्च शक्तिश्च शक्ती, ताभ्यां विशिष्टौ शक्तिविशिष्टौ शिव-जीवौ, तयोरद्वैतं शक्तिविशिष्टाद्वैतम्" या व्युत्पत्त्यनुसार सर्वज्ञत्व, सर्वकर्तृत्व आदि सूक्ष्मचिदचित्शक्तिविशिष्ट शिव आणि अल्पज्ञत्व, अल्पकर्तृत्व आदि स्थूलचिदचित्शक्तिविशिष्ट जीव या दोहोंच्या अभेदास, अर्थात् अद्वैतास दाखविणारा सिद्धान्तच शक्तिविशिष्टाद्वैत सिद्धान्त होय. भ्रमर-कीटक न्यायानें या सिद्धान्ताची उपपत्ति केली जाते. ज्याप्रमाणें भ्रमराच्या अत्यन्त भिन्न स्वभावाचा कीटक भ्रमराच्या निरन्तर ध्यानानें भ्रमर बनतो, तद्वतच शिवापासून अत्यन्त भिन्न स्वभावाचा जीवसुद्धां शिवाचें निरन्तर ध्यान करून आपल्या संकुचित शक्तीचा विकास करून शिवस्वरूप होऊन जातो. हेंच शक्तिविशिष्टाद्वैताचें तात्पर्य होय.

वीरशैवांच्या या दार्शनिक पारिभाषिक शब्दांच्या विश्लेपणानें हा सिद्धान्त भेदाभेदप्रतिपादक आहे, याचें ज्ञान होतें. अतः याला भेदाभेद आणि द्वैताद्वैत शब्दानेहि अभिहित केलें जातें.

वीरशैव धर्म-दर्शनाचे संस्थापक आचार्य

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भूतले।
तदा तदाऽवतारोऽयं गणेशस्य महीतले॥

स्कन्दपुराणाच्या या प्रमाणवचनानें धर्माला ग्लानी आल्यानंतर भगवान् शिव आपले विशेष अंश असलेल्या शिवगणांच्या रूपांत अवतरित होऊन

प्रत्येक युगाच्या प्रारंभी धर्मांची स्थापना करतात. या सनातन वीरशैव धर्मांचे संस्थापक पांच आचार्य आहेत. शिवाच्या सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष आणि ईशान मुखाच्या रूपानें, विराजमान कुल्यपाक येथील श्री सोमेश्वरलिंग, वटक्षेत्रातील श्री सिद्धेश्वरलिंग, द्राक्षारामक्षेत्रातील श्री रामनाथलिंग, सुधाकुण्ड क्षेत्रातील श्री मल्लिकार्जुनलिंग आणि काशीक्षेत्रांतील श्री विश्वनाथलिंग या पांचही शिवलिंगापासून क्रमशः श्री रेवणाराध्य, श्री मरुळाराध्य, श्री एकोरामाराध्य, श्री पंडिताराध्य व श्री विश्वाराध्य नांवाचे पांच आचार्य प्रत्येक युगात विभिन्न नावांनी अवतरित होऊन वीरशैव धर्मांची स्थापना करीत आले आहेत. त्यांचें संक्षिप्त विवरण पुढीलप्रमाणें—

( १ ) श्री ज. रेवणाराध्य ( रेवणसिद्ध )

श्री जगद्गुरु रेवणाराध्य शिवाच्या आदेशानुसार वीरशैव धर्माच्या स्थापनेसाठी प्रत्येक युगात आन्ध्रप्रदेशातील सुप्रसिद्ध कोल्लिपाक क्षेत्रातील सोमेश्वरलिंगापासून अवतार घेत आले आहेत. त्यांची नांवे—कृतयुगात एकाक्षर शिवाचार्य, त्रेतायुगात एकवक्त्र शिवाचार्य, द्वापरयुगात रेणुक शिवाचार्य आणि कलियुगात रेवणाराध्य ( रेवणसिद्ध ) या नावानें प्रसिद्ध आहेत.

अथ त्रिलिङ्गविषये कुल्यपाकाभिधे स्थले।
सोमेश्वरमहालिङ्गात् प्रादुरासीत् स रेणुकः॥

( सि. शि. ४।१ )

सिद्धान्तशिखामणितील या वचनानुसार द्वापरयुगातील श्री ज. रेणुकशिवाचार्यांनी कोल्लिपाक येथील श्री सोमेश्वरलिंगापासून अवतार घेऊन मलयपर्वतावर विराजमान असलेल्या महामहिमाशाली श्री अगस्त्य महर्षींना वीरशैव सिद्धान्ताचा उपदेश केला. शिवयोगि शिवाचार्यांनी संग्रहित केलेला तो उपदेशच आजमितीस 'सिद्धान्तशिखामणि' या नावाने प्रसिद्ध आहे. धर्मप्रचारार्थ यांनी कर्नाटकातील 'बाळेहोन्नूर' येथें पीठाची स्थापना केली. तें पीठ रंभापुरी पीठ या नांवाने प्रसिद्ध आहे. यांची शाखा रेणुक शाखा आहे. यांचें सिंहासन वीरसिंहासन आहे. हे वीरगोत्राचे आदिगुरु मानले जातात.

तस्येति वचनं श्रुत्वा राक्षसेन्द्रस्य धीमतः ।
तथेति प्रतिशुश्राव सर्वज्ञो गणनायकः ॥
तत्र सन्तुष्टचित्तस्य पौलस्त्यस्येष्टसिद्धये ।
कोटित्रयं तु लिङ्गानां यथाशास्त्रं यथाविधि ॥
त्रिकोट्याचार्यरूपेण स्थापितं तेन तत्क्षणे ।
( सि. शि. २१।३०-३१ )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनावरून हें सिद्ध होतें कीं, रावणानें आपल्या जीवनकालामध्यें नऊ कोटी शिवलिंगांची स्थापना करण्याचा संकल्प सोडला होता. परंतु तो सहा कोटी लिंगांचीच स्थापना करू शकला. मृत्यू-समयी त्याने आपला धाकटा बंधु विभीषणाकडून स्थापन करण्याची राहि-लेलीं तीन कोटी शिवलिंगें स्थापन करण्याचें वचन घेतलें होतें. जेव्हां श्री रेणुकाचार्य आकाशमार्गाने लंकेत पोंचले, तें पाहून व त्यांचा महिमा जाणून विभीषणानें आपल्या भावाचा संकल्प पूर्ण करण्याची त्यांना प्रार्थना केली. विभीषणाच्या प्रार्थनेनुसार श्री रेणुकाचार्यांनी एकाच वेळीं तीन कोटी आचार्यांचे रूप धारण करून तीन कोटी शिवलिंगांची स्थापना करून कोल्लि-पाक क्षेत्रांत येऊन पुन्हां त्याच सोमेश्वरलिंगात शिवाच्या आज्ञेनुसार विलीन झाले.

श्रीमद्रेवणसिद्धस्य कुल्यपाकपुरोत्तमे ।
सोमेशलिङ्गाज्जननमावासः कदलीपुरे ॥

स्वयंभुव आगमातील या वचनानुसार तेच रेणुकाचार्य कलियुगाच्या प्रारंभीं त्याच सोमेश्वरलिंगापासून रेवणसिद्ध या नावाने अवतरित झाले. त्यांनी चौदाशे वर्षें भूतलावर वास करून अनेक लीला केल्या. त्यांत ज्या विक्रम राजाच्या नावानें विक्रमसंवत् चालू आहे, त्याला विजयखड्ग प्रदान करणें, कांची येथील विजयेन्द्र चोल राजास अनुग्रह करणें, कोल्हापूर ( महाराष्ट्र ) च्या गोरक्षनाथाचा गर्व हरण करणें आणि जगद्गुरु आदि-शंकराचार्यांना चंद्रमौलीश्वर लिंग देणें व रत्नगर्भ गणपती प्रदान करणें इत्यादि प्रसिद्ध आहेत.

जगद्गुरु आद्यशंकराचार्यांचें चरित्र प्रतिपादन करणारे अनेक ग्रंथ आहेत. त्यांत, गुरुवंशकाव्य नांवाचा एक ग्रंथ आहे. तो श्रृंगेरी पीठाचे आस्थानपण्डित काशीलक्ष्मण शास्त्रींनी लिहिला आहे. त्यांत—

श्रीचन्द्रमौलीश्वरलिङ्गमस्मै
सद्रत्नगर्भं गणनायकं च ।
स विश्वरूपाय सुसिद्धदत्तं
दत्वा न्यगादीच्चिरमर्चयेति ।। ( ३।३३ )

जगद्गुरु श्री शंकराचार्य श्रृंगेरीहून कांचीस जातेवेळीं त्यांनी आपला पट्टशिष्य सुरेश्वराचार्य यास बोलावून श्री रेवणसिद्ध महायोग्यांनी दिलेले चन्द्रमौलीश्वरलिंग आणि रत्नगर्भ विनायक त्याच्या स्वाधीन केले आणि त्यांच्या पूजेची जबाबदारी त्याच्यावर सोपविली. या श्लोकाची व्याख्या लिहितांना ग्रंथकाराने "सुसिद्धदत्तं सुसिद्धेन रेवणसिद्धमहायोगिना दत्तं श्रीचन्द्रमौलीश्वरलिङ्गम्" असा सुसिद्ध शब्दाचा अर्थ 'रेवणसिद्ध महायोगी' असा स्पष्ट केला आहे. अतः आजपर्यंत श्रृंगेरी पिठांत विराजमान असलेले चन्द्रमौलीश्वरलिंग वीरशैव मताचे संस्थापक कलियुगातील आचार्य श्री रेवण-सिद्ध महायोगी यांच्याकडून प्राप्त झाल्याचे सिद्ध होतें.

आचार्य बलदेव उपाध्याय, यांनीं हिंदीत शंकरदिग्विजय ग्रंथ लिहिला आहे. गुरुवंश काव्यानुसार शंकराचार्यांचे चरित्र लिहितांना त्याचें वैशिष्ट्य त्यांनी पुढीलप्रमाणें दाखविलें आहे.

"शारदा को हराया और उन्हें श्रृंगेरी में अपने साथ ले आये । शारदा की प्रतिष्ठा की और चन्द्रमौलीश्वर लिंग, जिसे रेवणमहायोगी ने दिया था, रत्नगर्भ विनायक तथा शारदा की पूजा का भार सुरेश्वर पर रखकर वे काञ्ची पधारे ।" ( शंकरदिग्विजय, परिशिष्ट ( क ), पृ० ५८८ )

( "शारदेला हरविलें आणि तिला आपल्यावरोबर त्यांनी श्रृंगेरीस आणलें. शारदेची प्रतिष्ठापना केली. रेवणमहायोगी यांनी दिलेलें चन्द्रमौलीश्वर लिंग, रत्नगर्भ विनायक आणि शारदेच्या पूजेचा भार सुरेश्वरांवर सोंपवून ते काञ्चीस आले. )

'गुरुवंश काव्य' ग्रन्थासंबंधी आचार्य बलदेव उपाध्याय म्हणतात—

"ग्रन्थकार के शृंगेरीमठ के पण्डित होने से तथा हस्तलिखित प्रति के शृंगेरी से उपलब्ध होने के कारण यह अनुमान करना असंगत न होगा कि इस ग्रन्थ में दिया गया चरित शृंगेरी परम्परा के अनुसार ही है। ग्रन्थ की पुष्पिका में "सच्चिदानन्दभारतीमुनीन्द्रनिर्मापिते" से इसकी पुष्टि भी होती है।" ( शंकरदिग्विजय, पृ० ५८६ )

। "ग्रंथकार शृंगेरीमठाचे पंडित होते. हस्तलिखित प्रत शृंगेरीतच उपलब्ध झाली. यावरून या ग्रंथात दिलेलें चरित्र शृंगेरी परंपरेला अनुसरूनच आहे, असें अनुमान करणें विसंगत होणार नाहीं. ग्रंथाच्या पुष्पिकेत "सच्चिदानन्दभारती-मुनीन्द्रनिर्मापिते" असें लिहिलें आहे. त्यावरून या विधानास पुष्टी मिळते." )

निट्टूर नञ्जनाचार्यांनी लिहिलेल्या वेदान्तसारवीरशैवचिन्तामणि या ग्रंथात—

शङ्कराचार्यसन्नामयोगीन्द्राय महोज्ज्वलम् ।
चन्द्रमौलीश्वरं लिङ्गं दत्तवानिति विश्रुतम् ॥
श्रीरेणुकगणेशाख्यं रेवणासिद्धदेशिकम् ।
वीरशैवमताचार्यं वन्देऽहं तं जगद्गुरुम् ॥

स्तोत्ररूपानें लिहिलेल्या या श्लोकानें रेणुकाचार्यांचाच दुसरा अवतार जो रेवणसिद्ध या नांवाने झाला होता, त्यांच्याकडूनच आद्यशंकराचार्यांना चन्द्रमौलीश्वरलिंगाची प्राप्ती झाली होती; ही गोष्ट सिद्ध होते. श्री ज० शंकराचार्यांचे शृंगेरी पीठ आणि श्री ज. रेवणसिद्धांचे रम्भापुरी पीठ दोन्ही समीप आहेत. प्राचीन कालापासून दोन्ही पिठांचा मधुर संबंध आहे. रम्भापुरी पीठ परंपरेत आज मितीस श्री १००८ जगद्गुरु प्रसन्नरेणुक वीररुद्रमुनी शिवाचार्य हे अधिकारावर आहेत. त्यांचे वय ६२ वर्षांचे आहे.

( २ ) श्री ज. मरुळाराध्य

भगवान् शिवाच्या आज्ञेवरून श्री ज. मरुळाराध्य, वीरशैव धर्माच्या स्थापनेसाठी क्षिप्रा नदीच्या कांठी विराजमान असलेल्या वटक्षेत्रातील सिद्धे-

श्वर लिंगापासून प्रत्येक युगात अवतार घेत आले आहेत. कृतयुगांत द्व्यक्षर-शिवाचार्य, त्रेतायुगांत द्विवक्त्रशिवाचार्य, द्वापरयुगांत दारुकशिवाचार्य आणि कलियुगांत मरुळाराध्यशिवाचार्य, अशाप्रकारें प्रत्येक युगांत त्यांची भिन्न भिन्न नांवे आहेत.

तद्वन्मरुळसिद्धस्य वटक्षेत्रे महत्तरे।
सिद्धेशलिङ्गाज्जननं स्थानमुज्जयिनीपुरे ॥

स्वायंभुव आगमाच्या या वचनानुसार यांनी धर्मप्रचारार्थ उज्जयिनी ( मध्यप्रदेश ) येथे पीठाची स्थापना केली. तें उज्जयिनी पीठ या नांवानें प्रसिद्ध आहे. अलिकडे ते पीठ मध्यप्रदेशातून कर्नाटकातील बल्लारी जिल्ह्यातील 'उज्जयिनी' नगरात स्थानान्तरित झालें आहे. या पीठाचे द्वापरयुगाचे आचार्य दारुकाचार्य होते. त्यांनी त्याकाळीं सुप्रसिद्ध दधीचि महर्षींना शिव-तत्त्वाचा उपदेश करून कृतार्थ केले होते. कलियुगातील श्री ज. मरुळाराध्य हे नन्दी गोत्राचे आद्यगुरु आहेत. यांची शाखा दारुकशाखा आहे. यांचें सिंहासन सद्धर्मसिंहासन या नांवाने प्रसिद्ध आहे. श्री ज. मरुळाराध्य यांनीं आपल्या कालखंडांत सर्वत्र संचार करून वीरशैव धर्माच्या स्थापनेबरोबरच आपली शिष्यसम्पत्ति वाढविली. त्यांच्या अवताराचें प्रयोजन समाप्त होतांच पुन्हां ते सिद्धेश्वरलिंगात विलीन झाले. त्यांच्यानंतर त्या गुरुपीठाची परंपरा अक्षुण्ण चालत आलेली आहे. या पीठाचे सांप्रतचे जगद्गुरु श्री १००८ जगद्गुरु सिद्धेश्वरशिवाचार्य हे आहेत. ते ९'१ वर्षांचे वयोवृद्ध आहेत.

( ३ ) श्री ज. एकोरामाराध्य

श्री ज. एकोरामाराध्य यांनी शिवाच्या आदेशानुसार वीरशैव मताच्या स्थापनेसाठीं द्राक्षाराम क्षेत्रातील श्रीरामनाथलिंगातून अवतार घेतला. कृत-युगांत त्र्यक्षरशिवाचार्य, त्रेतायुगांत त्रिवक्त्रशिवाचार्य, द्वापरयुगांत घण्टाकर्ण-शिवाचार्य आणि कलियुगांत एकोरामाराध्य हीं त्यांची नांवें होत.

द्राक्षारामे रामनाथलिङ्गाद्युगचतुष्टये।
एकोरामस्य जननमावासस्तु हिमालये ॥

स्वायंभुव आगमाच्या या वचनानुसार यांनीं धर्मप्रचारार्थ हिमालयांत पीठाची स्थापना केली. तें केदारपीठ या नांवाने प्रसिद्ध आहे. यालाच वैराग्य-सिंहासन असे संबोधिले जाते.

या पीठाचे कृतयुगातील आचार्य त्र्यक्षरशिवाचार्यांकडून तदानीन्तन सूर्य-वंशाचे महाराज मान्धाता यांनी शिवसिद्धान्ताचा उपदेश प्राप्त केला होता. त्यांनी आपलें आयुष्य अंतिम क्षणापर्यंत या पीठाच्या सेवेंतच व्यतित केलें. त्याचें प्रतीक म्हणून त्यांची एक शिलामूर्ति अद्याप त्या पिठात विराजमान आहे.

या पीठाचे द्वापरयुगातील आचार्य घण्टाकर्णशिवाचार्य यांनीं सर्व शिव-क्षेत्रांत संचार करून शिवतत्त्वाचा प्रचार केला. शिवाशिवाय अन्य कोणत्याहि देवतेचे नांव ऐकूं येऊ नये म्हणून त्यांनी आपल्या कानांत कुण्डलांच्या ऐवजीं लहान घंटी आभूषण म्हणून धारण केली होती. त्यामुळें त्यांचें नांव घण्टाकर्ण शिवाचार्य पडलें. हे काशीला येऊन गंगेच्या कांठीं बरींच वर्षें राहिले, त्याच कालांत त्यांनीं व्यास महर्षींना शिवतत्त्वाचा उपदेश केला. काशी येथें व्यासे-श्वर शिवमंदिरात हातांवर शिवलिंग ठेवून पुजेंत मग्न असलेली एक मूर्ति आहे. तिला आजहि 'व्यासांचे गुरु' म्हणून संबोधतात. ती मूर्ति घण्टाकर्ण शिवाचार्यांचीच आहे. त्या मंदिराजवळ एक तलाव होता. त्याला घण्टाकर्ण तलाव म्हणत असत. हल्लीं तेथें तो तलाव नाहीं.

कलियुगाच्या प्रारंभीं या पीठाचे जगद्गुरु एकोरामाराध्य हे होते. यांच्या कालांत बाणासुराची कन्या उषा हिने येथें राहून शास्त्रांचे अध्ययन केलें होतें. गुरुकृपेनें ती विदुषी होऊन उषादेवी या नावानें प्रसिद्ध झाली होती. श्रीमती उषादेवी व तिचा पति अनिरुद्ध यांनी अनेक वर्षें केदारपिठात राहून गुरुसेवे-प्रीत्यर्थ भव्य मठाची स्थापना केली. उषामठ म्हणून तो मठ प्रसिद्ध आहे. हल्लीं तो मठ ऊखीमठ म्हणून संबोधिला जातो.

श्री एकोरामाराध्यांच्या तपप्रभावानें अनेक राजे महाराजे त्यांचे शिष्य झाले. त्यांनी भूमिदान देऊन आपल्या जीविताचे सार्थक केलें. राजा जनमेजय

यांनीं भूदान दिलेल्या उल्लेखाचा ताम्रपट अद्याप ऊखीमठात आहे. तो पुढील-प्रमाणें आहे—

॥ श्रीकेदारेश्वराय नमः ॥

स्वस्ति श्रीजयाभ्युदययुधिष्ठिरशके प्लवङ्गाख्ये एकोननवतितमवत्सरे सहसि मासि अमावास्यायां सोमवासरे श्रीमन्महाराजाधिराजपरमेश्वरवैयाघ्रपदगोत्रज श्रीजनमेजय-भूपा इन्द्रप्रस्थनगरीसिंहासनस्थाः सकलवर्णाश्रमधर्मपरिपालका उत्तरहिमालये श्रीकेदारक्षेत्रे तत्रत्यमुनिरुषामठस्य श्रीगोस्वामिआनन्दलिंगजंगम-श्रीमच्छिष्यज्ञानलिंगजंगमद्वारा आराधितश्रीकेदारनाथस्य पूजार्थं चतुःसीमा-परिमितक्रमः । पूर्वभागे दक्षिणवाहिनी मन्दाकिनी, पश्चिमदक्षिणभागे क्षीरगङ्गा, उत्तरपश्चिमे मधुगङ्गा, पूर्वोत्तरभागे स्वर्गद्वारनदी, दक्षिणे सरस्वतीमन्दाकिन्योः संगमः । एतन्मध्ये श्रीकेदारक्षेत्रम् । भवच्छिष्यपरम्परया चन्द्रार्कपर्यन्तं निधिनिक्षेपजलपाषाणागामिसिद्धसाध्यतेजःस्वाम्यसहितं स्वबुध्या-नुकूल्येनास्मन्मातृपितॄणां शिवलोकप्राप्त्यर्थं श्रीकेदारेश्वरसन्निधावुपरागसमये सहिरण्यमन्दाकिनीजलधारापूर्वकं क्षेत्रमिदं हस्ते दत्तवानस्मि । एतद्धर्मसाधनस्य साक्षिणः—

आदित्यचन्द्रावनिलोऽनलश्च द्यौर्भूमिरापो हृदयं यमश्च ।
अहश्च रात्रिश्च उभे च सन्ध्ये धर्मश्च जानन्ति नरस्य वृत्तम् ॥

दानपालनयोर्मध्ये दानाच्छ्रेयोऽनुपालनम् ।
दानात् स्वर्गमवाप्नोति पालनाद् द्विगुणं फलम् ॥
स्वदत्ताद् द्विगुणं पुण्यं परदत्तानुपालनम् ।
परदत्तापहारेण स्वदत्तं निष्फलं भवेत् ॥
स्वदत्ता पुत्रिका ज्ञेया पितृदत्ता सहोदरा ।
अन्यदत्ता तु जननी दत्तभूमिं परित्यजेत् ॥
अन्यैस्तु छर्दितं भुञ्क्ते स्वार्थश्च छर्दितं न तु ।
ततः कष्टस्ततो नीचः स्वयं दत्तापहारकः ॥
स्वदत्तां परदत्तां वा ब्रह्मवृत्तिं हरेच्च यः ।
षष्टिवर्षसहस्राणि विष्ठायां जायते क्रिमिः ॥ इति ।

याचें तात्पर्य असें—

हिमवत् केदारमध्यें महाराजा जनमेजय यांच्या कारकिर्दीत स्वामी आनंदलिंग जंगम तेथील मठाचे जगद्गुरु होते. त्यांच्या नांवाने जनमेजयांनी, मन्दाकिनी, क्षीरगंगा, सरस्वती आदि नद्यांच्या संगमाच्या क्षेत्रांत जेवढी भूमी आहे, त्याला केदारक्षेत्र म्हणतात, त्याचें दान या उद्देशानें केलें कीं ऊखीमठाचे आचार्य गोस्वामी आनंदलिंग जंगम यांचे शिष्य श्री केदारक्षेत्रवासी श्री ज्ञानलिंग जंगम यांनी याच्या उत्पन्नातून भगवान् केदारेश्वराची पूजा करावी. त्यांनीं सूर्यग्रहणसमयीं केदारेश्वरास साक्षी ठेवून आपल्या माता-पित्याच्या शिवलोकप्राप्तीसाठी त्यांना हें क्षेत्र पूर्ण अधिकारासहित दान दिलें आहे. हें दान महाराजा जनमेजय यांनी मार्गशीर्ष अमावस्येस सोमवारी युधिष्ठिर राजाच्या राज्यारोहणास ८९ वर्षें झाल्यानंतर प्लवंगनाम संवत्सरांत दिलें.

या दानपत्राच्या आधारावर श्री केदारेश्वरांचे मंदिर आणि ऊखीमठ पांच हजार वर्षांहून अधिक पुरातन आहे, हें सिद्ध होतें. टेहरी नरेश या पीठाचे शिष्य आहेत. या पीठाच्या जगद्गुरूंना 'रावल' या उपाधीने संबोधिले जाते. टेहरी नरेश यांच्या तिलकोत्सव समारंभात ही 'रावल' उपाधि बहाल करतात.

या केदारपीठाची गुरुपरंपरा अविच्छिन्न गतीनें अनादि कालापासून चालत आलेली आहे. गढवालच्या इतिहासावरून पाहतां, तीनशे चोवीस जगद्गुरूंची नांवें, समय याची माहिती मिळते. या पीठाचे ३२४वे रावल श्री १००८ जगद्गुरु नीलकंठलिंग शिवाचार्यांनी ऊखीमठ आणि गुप्तकाशीच्या मध्यभागी 'उत्तराखंड विद्यापीठ' नांवाच्या शिक्षण संस्थेची स्थापना केली आहे. त्या संस्थेत संस्कृत, हिन्दी, आयुर्वेद इ.चे शिक्षण दिलें जातें. त्यांच्या स्मरणार्थ त्या विद्यापिठात रावल श्री १००८ जगद्गुरु नीलकंठलिंग शिवाचार्यांची अमृतशिलेची प्रतिमा प्रतिष्ठापित करण्यात आली आहे.

अशा प्रकारें हें पीठ उत्तराखंडात आध्यात्मिक आणि सामाजिक क्षेत्रांत योगदान करीत आहे. शालिवाहन शके १९०७ क्रोधननामसंवत्सर ज्येष्ठ कृष्ण

पंचमी दिनांक ७-६-१९८५ शुक्रवार रोजीं शुभमुहूर्तावर पट्टाभिषेक झालेले रावल श्री १००८ सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य या पीठपरंपरेचे ३२७वे रावल होत. या पीठाच्या परंपरेच्या अधिक माहितीसाठीं गढवालचा इतिहास आणि श्री रामदास गौड यांनी लिहिलेलें 'हिंदुत्व' या पुस्तकाचें अवश्य अवलोकन करावें.

( ४ ) श्री ज. पण्डिताराध्य

श्री ज. पण्डिताराध्य यांनीं भगवान् शिवाच्या आज्ञेनुसार वीरशैव धर्म स्थापन करण्यासाठीं श्रीशैल ( आन्ध्रप्रदेश ) क्षेत्रांत विराजमान असलेल्या श्री मल्लिकार्जुन ज्योतिर्लिंगातून चारही युगांत भिन्न भिन्न नावांनी अवतार घेतला. कृतयुगात चतुरक्षर शिवाचार्य, त्रेतायुगात चतुर्वक्त्र शिवाचार्य, द्वापर-युगात धेनुकर्ण शिवाचार्य आणि कलियुगात पण्डिताराध्य शिवाचार्य या नांवांनी ओळखले जातात

सुधाकुण्डाख्यसुक्षेत्रे मल्लिकार्जुनलिङ्गतः ।
जननं पण्डितार्यस्य निवासः श्रीगिरौ शिवे ॥

स्वायंभुव आगमाच्या या वचनानुसार यांनी वीरशैव धर्माचा तत्त्वप्रसार करण्यासाठीं श्रीशैल येथेंच पीठाची स्थापना केली. तें श्रीशैलपीठ अथवा सूर्यसिंहासन या नावाने प्रसिद्ध आहे.

महर्षि सानन्द ज्यांनीं पंचाक्षर मंत्रोच्चारण करून नरकांतील समस्त प्राण्यांचा उद्धार केला होता, त्यांनी या पीठाचे द्वापरयुगातील आचार्य श्री धेनुकर्ण शिवाचार्य यांच्याकडून शिवतत्त्वाचा बोध घेऊन आपलें जीवन कृतार्थ केलें होतें.

कलियुगातील आचार्य श्री पण्डिताराध्य धेनुकर्ण शाखा आणि वृषभ-गोत्राचे आद्यगुरु मानले जातात. या पीठाची गुरुपरम्परा अव्याहत चालत आलेली आहे. सांप्रत या पीठाचे अधिकारी श्री १००८ जगद्गुरु वागीश पण्डिताराध्य शिवाचार्य हे विराजमान आहेत. ते ८४ वर्षांचे वयोवृद्ध आहेत. आपल्या पश्चात् पीठावर विराजमान होण्यासाठीं त्यांनी आपल्या शिष्यास

अधिकार दिला असून त्यांचे नांव श्री १००८ जगद्गुरु उमापति पण्डिताराध्य शिवाचार्य हें आहे.

( ५ ) श्री ज० विश्वाराध्य

वीरशैव धर्माच्या स्थापनेसाठीं श्री ज. विश्वाराध्य काशीक्षेत्रातील विश्वनाथ ज्योतिर्लिंगातून प्रत्येक युगात अवतार घेत आले आहेत. कृतयुगात पंचाक्षर शिवाचार्य, त्रेतायुगात पंचवक्त्र शिवाचार्य, द्वापरयुगात विश्वकर्ण शिवाचार्य व कलियुगात विश्वाराध्य शिवाचार्य या नावांनी ते प्रसिद्ध झाले.

काश्यां विश्वश्वरे लिङ्गे विश्वाराध्यस्य संभवः ।
स्थानं श्री काशिकाक्षेत्रे शृणु पार्वति सादरम् ॥

स्वायंभुव आगमाच्या या वचनानुसार वीरशैव तत्त्वप्रचारार्थं यांनी काशींत मठाची स्थापना केली. काशीपीठ अथवा ज्ञानसिंहासन म्हणून तें संबोधिले जाते. हल्लीं तें जंगमवाडी मठ या नावाने प्रसिद्ध आहे.

काशीमध्यें अत्यन्त पवित्र व 'आनन्दकानन' या नावानें प्रसिद्ध असलेल्या क्षेत्रात हा मठ विराजमान आहे. काशीखंडात या क्षेत्राचा महिमा वर्णन केला आहे. प्राचीन काळीं या क्षेत्रांत अनेक महर्षींनी तपश्चर्या करून आपापल्या नावांनी शिवलिंगांची स्थापना केली आहे. तीं अद्याप विद्यमान आहेत. त्यांना अवलोकन करून आजकाल भाविक लोकसुद्धां आपल्या पूर्वजांच्या नांवाने शिवलिंगांची स्थापना करीत असतात. हें स्थान हल्लीं पाहणाऱ्यांना संपूर्ण लिंगमय प्रतीत होतें.

सुप्रसिद्ध दुर्वासाऋषींना या पीठाचे ज० विश्वकर्ण शिवाचार्यांनीं शिवाद्वैत सिद्धान्ताचा उपदेश केला होता. या पीठाचे जगद्गुरु स्कन्दगोत्र व विश्वकर्ण शाखेचे आद्यगुरु मानले जातात.

काशीचा हा जंगमवाडी मठसुद्धा अतिप्राचीन आणि ऐतिहासिक आहे. या मठाचे 'मल्लिकार्जुन जंगम' या नांवाच्या जगद्गुरूंच्या कालांत त्यावेळचे काशीचे शासक श्री जयनन्द देव यांनीं विक्रम संवत् ६३१ मध्यें प्रबोधिनी एकादशीस भूमिदान केलें होतें. चौदाशे वर्षांपूर्वीचे ते प्राचीन दानपत्र आजही

मठात सुरक्षित आहे. मठाला दिल्या गेलेल्या जंगमपूरच्या त्या भूमीवर पंडित मदनमोहन मालवीय यांनी काशी हिन्दु विश्वविद्यालयाची स्थापना केली आहे. जयनन्द देवाच्या त्या दानपत्राची एक अनुदित प्रतिलिपि ताम्र-पटावर कोरलेली आहे. ती महाराजा प्रभुनारायण सिंह यांनीं कोरविली आहे. तीसुद्धां मठात सुरक्षित ठेवण्यात आलेली आहे.

काशीचे जयनन्द देव यांनी दिलेल्या दानशासनावर घेण्यात येणाऱ्या आक्षेपांवर 'व्योमकेश' यांनी 'नवनीत' पत्रिकेत लेख प्रकाशित करून प्रकाश टाकला आहे. त्यांत त्यांनी 'काशीतील जंगमवाडी मठात सुरक्षित चौदाशे वर्षापूर्वींचा शासनादेश' असा उल्लेख करून प्रमाणवद्ध रितीनें आक्षेपांचे निराकरण केलें आहे विक्रम संवत् ६३१ मधील काशीचा राजा जयनन्द देव यांच्यासंबंधीं माहिती कांही इतिहास-ग्रंथांत मिळत नाहीं. कारण पांचव्या शतकात कन्नौजच्या राजानें काशीवर अधिकार प्राप्त केला होता. या आक्षेपाचे उत्तर 'श्री व्योमकेश' यांनी पुढीलप्रमाणें दिलं आहे—

"यह बात सही है कि पाँचवीं शती में कन्नौज के राजा ने काशी पर आधिपत्य स्थापित कर लिया था। किन्तु काशी के राजा कन्नौज राज्य के अन्तर्गत स्वायत्त-शासनाधिकारसम्पन्न बने रहे।

प्राचीन इतिहास-ग्रन्थों में, यथा गदाधर भट्टकृत 'विजय ब्रजविलास' में जयनन्द देव को काशी का राजा बताया गया है। "जयनन्द देव देवता के समान था। काशी के लोग उसको देवता-तुल्य मानते थे। यह राजा अनन्त देव का पुत्र था। जयनन्द देव का पुत्र गोविन्द देव हुआ, जो अत्यन्त वीर और धीर था।" ( विजय ब्रजविलास, द्वितीय अध्याय, छंद संख्या ५-६ ) अतः संवत् ६३१ वि० में जयनन्द देव का काशी का राजा होना निश्चित है।" ( नवनीत, वर्ष : ३३, अंक ५, मई १९८४, पृ० १०६-१०७ )।

( "ही गोष्ट खरी आहे कीं पांचव्या शतकात कन्नौजच्या राजानें काशीवर आधिपत्य स्थापित केलें होतें. तथापि काशीनरेश कन्नौज राज्याच्या अन्तर्गत स्वायत्त शासनाधिकारयुक्त होते.

प्राचीन ऐतिहासिक ग्रंथांतील गदाधर भट्टकृत 'विजय ब्रजविलास' या ग्रंथांत जयनन्द देव यांना 'काशीचा राजा' असल्याचें ग्रथित केले आहे. "जयनन्द देव देवतासमान होते. काशीचे लोक त्यांना देवासमान मानीत असत. हा राजा अनन्त देवाचा पुत्र होता. जयनन्द देवाचा पुत्र गोविन्द देव हा अत्यंत वीर व धीर होता." ( विजय ब्रजविलास, द्वितीय अध्याय, छंद संख्या ५-६ ) अत: वि. संवत् ६३१ मध्यें जयनन्द देव यांचे काशीतील अस्तित्व निश्चित आहे." ) या विषयाचा विस्तार त्या लेखातच पहावयास मिळेल.

या मठात हुमायूं, अकबर, जहाँगीर, शाहजहाँ, औरंगजेब आणि मुहम्मद-शाह यांनीं मठास वेळोवेळीं दिलेली दानपत्रें आजहि मठांत मौलिक रूपांत जीर्ण-शीर्ण अवस्थेंत ठेंवण्यात आलेलीं आहेत. जिल्हा कोर्टापासून अलाहाबाद हायकोर्टापर्यंत या सर्व दानपत्रांची छाननी करण्यांत आली आहे.

सर यदुनाथ सरकार यांच्यासारख्या 'मोगल-काल-विशेषज्ञ' इतिहास-कारांनीहि यांची सत्यता मान्य केली आहे. बनारस गॅझेटियरमध्यें पृष्ठ १२३ वर या फर्मानांचा स्पष्ट उल्लेख आहे. या फर्मानांत या मठास दिलेल्या भूमिदानाचा स्पष्ट उल्लेख आहे.

हुमायूं बादशहानें मिर्जापूर जिल्हयातील चुनार नांवाच्या स्थानांत जंगमवाडी मठाच्या जंगमांच्या सहाय्यार्थ तीनशे बिघे जमीन दान दिली होती. त्याच्यानंतरच्या सर्व बादशहांनी या फर्मानाचा स्वीकार करून अन्य फर्मान दिले. ते आजपर्यंत मठात आहेत. मोगल बादशहांची दानपत्रें १५३० ते १७८४ इ० पर्यंतचे आहेत. हुमायूंनंतर अकबर बादशहानें ४८० बिघे जमीन दान दिली होती. अकबराची तीन फर्मानें मठात आहेत. जहाँगीरच्या कारकिर्दीतील दोन फर्मानें आहेत. त्यांत अकबरानें दिलेल्या दानाची तपासणी व त्यांचे समर्थन आहे. शाहजहान बादशहाचीं १६ फर्मानें आहेत.

मोगलांमधील सर्वांत क्रूर व तथाकथित हिन्दूद्रोही औरगजेबाच्या संबंधी पुढील कथा प्रचलित आहे. औरंगजेब काशीत आल्यानंतर त्यानें मन्दिरांचा

विध्वंस करण्याची मोहीमच उघडली. मंदिरें उध्वस्त करीत तो जंगमवाडी मठास आला. मठात प्रवेश करतांच त्याला भास झाला कीं भीमकाय काळी देवछाया त्याच्याकडे आपल्या इंगळासारख्या लाल नेत्रांनी त्याच्याकडे क्रोधानें पाहात आहे. त्याला गिळंकृत करील कीं काय अशी त्याला भीति वाटली. साम्राज्य आणि सैन्यबलानें सुसज्ज असलेला बादशहाचा थरकाप झाला. तो गलितगात्र होऊन तात्काळ मठाच्या बाहेर आला. मठ उध्वस्त करण्याचा विचार त्याला सोडून द्यावा लागला. उलट औरंगजेबानें मठाला भूमि दान दिली. हस्ताक्षरयुक्त अस्सल दानपत्र मठात अद्याप सुरक्षित असून त्यात हें वर्णन केलेले आहे.

नेपाळमध्यें ( भक्तपुर ) भातगाव येथें या मठाचा एक शाखामठ आहे. तेथेंही तो जंगमवाडी मठ या नांवाने प्रसिद्ध आहे. त्या मठासाठीहि विक्रम संवत् ६९२ ज्येष्ठ शुद्ध अष्टमी या दिवशीं नेपाळचे महाराज विश्वमल्ल यांनी श्री मल्लिकार्जुन यतींना भूमिदान केलें होतें. त्या दानपत्राचा शिला-लेख अद्याप त्या मठात उपलब्ध आहे. हल्लीं त्या मठात गृहस्थ परंपरेचे जंगम वास्तव्य करतात.

काशी जंगमवाडी मठाची गुरुपरम्परासुद्धां अक्षुण्ण गतीनें चालत आलेली आहे. आतापर्यंत ऐतिहासिक नोंदीप्रमाणें ८४ जगद्गुरु होऊन गेले. सांप्रत श्री १००८ जगद्गुरु विश्वेश्वर शिवाचार्य महाराज सिंहासनावर विराजमान आहेत. ते ६८ ( अडुसष्ठ ) वर्षांचे आहेत.

उपर्युक्त पांचही पिठांचे आचार्य पंचाचार्य संबोधिले जातात. कलियुगाच्या प्रारंभी अवतीर्ण झालेले रेवणाराध्य, मरुळाराध्य, एकोरामा-राध्य, पंडिताराध्य आणि विश्वाराध्य नामक पांच आचार्यांकडून वीरशैव धर्माची स्थापना झाली आहे. या प्राचीन आचार्यांनी स्थापन केलेल्या मठांत वीरमाहेश्वर ( जंगम ) वंशोत्पन्न ब्रह्मचारी बटूंनाच पट्टाभिषेक केला जातो. हेच वीरशैव धर्माचे पांच जगद्गुरु होत. यांच्याशिवाय या धर्माचे जे गुरु

आहेत, ते सर्व याच पंचाचार्यांच्या शाखा मठांचे अधिकारी व अनुयायी शिष्य आहेत.

**वीरशैव धर्माच्या पुनरुज्जीवनात श्री बसवेश्वरांचे योगदान**

ख्रि. श. बाराव्या शतकात कर्नाटकात अत्यंत प्रख्यात असलेल्या चालुक्य वंशाच्या बिज्जल महाराजांचे प्रधानमंत्री श्री बसवेश्वर यांनी या धर्माची स्थापना केली, असा प्रवाद ऐकू येतो. परंतु ही गोष्ट असत्य आहे. कर्नाटकातील बागेवाडी ( हल्ली जिल्हा विजापूर ) येथील श्री मादरस आणि मादलाम्बिका या ब्राह्मण दांपत्यापासून जन्मलेल्या श्री बसवेश्वरांनी आपल्या आठव्या वर्षी ब्राह्मणोचित उपनयन संस्काराचा त्याग करून, त्याकालीं कूडलसंगम क्षेत्रात प्रसिद्ध असलेले वीरशैवाचार्य श्री जातवेदमुनि शिवाचार्यांकडून वीरशैवधर्मोचित शिवलिंगदीक्षा ग्रहण केली होती. यावरून हें सिद्ध होते कीं बसवेश्वरांच्या पूर्वीं हा धर्म होता व त्याचे आचार्यही होते.

ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे कीं, वीरशैव धर्मात दीक्षा घेतल्यानंतर या धर्माच्या पुनरुज्जीवनासाठी श्री बसवेश्वर यांनी बरेच परिश्रम केले. सनातन अद्वैत तत्त्वाचा भगवत्पाद आद्यशंकराचार्यांद्वारें अत्यंत प्रचार झाल्यामुळें त्यांना जसे अद्वैतमताच्या संस्थापकाच्या रूपांत मान्यता मिळाली; तद्वतच सनातनवीरशैव धर्माचा अधिक प्रचार बाराव्या शतकांत श्री बसवेश्वरांच्याकडून करण्यांत आल्यामुळें त्यांनासुद्धां वीरशैव धर्माच्या संस्थापकाच्या रूपांत मान्यता मिळाली. हें यथार्थ नव्हे, अर्थवाद आहे.

वीरशैव धर्माचे थोर आधुनिक ऐतिहासिक व दार्शनिक विद्वान डॉ. एस्. सी. नन्दीमठ यांनी नमूद केलें आहे कीं—

"The darkness surrounding the early history of the sect has led almost all scholars ( Dr. Bhandarkar excepted ) to conclude that it was founded by Basava, the minister of Kalacuri King Bijjaḷa ( 1162–1167 A. D. ). However, this is

far from the truth, for none of the books on Virasaivism, either in Kannada or in Sanskrit, ascribe the foundation of the sect to Basava."

( A Handbook of Virasaivism, p. 2 )

अशाप्रकारें श्री वसवेश्वरांच्या वीरशैव धर्मसंस्थापकत्वाचें निराकरण केलें आहे. त्याचे तात्पर्य हें आहे कीं—डॉ. भाण्डारकर सोडल्यास अन्य सर्व संशोधकांच्या बुद्धीत हा अंधार पसरला आहे कीं, वसवेश्वरच वीरशैव मताचे संस्थापक आहेत. वीरशैव धर्माच्या कन्नड अथवा संस्कृत कोणत्याही ग्रंथात श्री वसवेश्वरांचा धर्म-संस्थापक म्हणून उल्लेख करण्यात आलेला नाहीं. अतः श्री वसवेश्वर हे या धर्माचे संस्थापक होऊ शकत नाहींत.

दक्षिण भारतातील प्रमुख इतिहासविद् श्री. के. ए. नीलकंठशास्त्रींनी लिहिलें आहे कीं,—

"Lingayat tradition avers that the sect is very old and was founded by five ascetics—Ekorāma, Panditārādhya, Revana, Marula and Vishvārādhya who were held to have sprung from the five heads of Śiva. Basava, they say, was but the reviver of the Faith." ( A History of South India, p. 435 )

लिंगायत ( वीरशैव ) धर्म अत्यंत प्राचीन आहे. शिवाच्या पांच मुखांतून आविर्भूत एकोराम, पंडिताराध्य, रेवण, मरुळ आणि विश्वाराध्यनामक पांच आचार्यांनी या धर्माची स्थापना केली. त्यानुसार वसवेश्वर या धर्माचे केवळ पुनरुज्जीवक होते.

पाश्चात्य विद्वान डॉ. जे. एन. फर्क्युहर म्हणतात—

"The tradition is that the sect was founded by five ascetics—Ekorāma, Panditārādhya, Revana, Marula, Vishvārādhya who are held to have sprung from the five

heads of Śiva, incarnatic age after age. These are regarded as very ancient and Basava is said to have been but the reviver of the faith." ( An outline of the religious literature of India, p. 260 )

प्रत्येक युगात शिवाच्या पांच मुखांपासून उत्पन्न झालेले एकोराम, पण्डिताराध्य, रेवण, मरुळ आणि विश्वाराध्य नांवाच्या पांच यतींनी या धर्माची स्थापना केली. हे पांच आचार्य अत्यंत प्राचीन आहेत. बसवेश्वर या धर्मांचे पुनरुज्जीवक होत.

डॉ. यदुवंशी यांचे म्हणणें असें आहे कीं—

"दक्षिण में एक नये सम्प्रदाय का प्रादुर्भाव हुआ, जिसका आगे चलकर बड़ा महत्त्व हुआ। यह था 'लिंगायत' अथवा 'वीरशैव' सम्प्रदाय। इस सम्प्रदाय का जन्म कब और कैसे हुआ तथा इसका संस्थापक कौन था, यह अभी तक विवादास्पद विषय है। परन्तु एक बात तो निश्चित है कि प्रख्यात 'वसव' इस सम्प्रदाय के जन्मदाता नहीं थे, यद्यपि इन्होंने इसको बहुत सहायता दी।" ( शैवमत, पृ. १५८-१५९ )

( "दक्षिणेंत एका नव्या सम्प्रदायाचा प्रादुर्भाव झाला, ज्याला पुढें फार महत्त्व आलें. हा 'लिंगायत' अथवा 'वीरशैव' सम्प्रदाय होय. या सम्प्रदायाचा जन्म केव्हां व कसा झाला, याचा संस्थापक कोण होता, हा आतापर्यंत विवादात्मक विषय आहे. परंतु एक गोष्ट निश्चित आहे कीं, जरी बसवांनीं त्याला फार मोठें सहाय्य केलें असले तरी प्रख्यात 'वसव' या सम्प्रदायाचे संस्थापक नव्हत." )

अशा प्रकारें प्राचीन आगम साहित्यापासून आधुनिक विद्वानांच्या तर्कबद्ध विचारांवरूनहि हेंच सिद्ध होते कीं, युगारंभीं पंचाचार्यांनीं स्थापन केलेल्या वीरशैव धर्माचा जेव्हां बाराव्या शतकांत ऱ्हास होऊ लागला, त्यावेळीं बसवेश्वरांचा जन्म झाला; आणि त्यांनी या धर्माची दीक्षा घेऊन आपल्या जीवनांत या धर्माच्या तत्त्वप्रचारासाठीं अत्यंत परिश्रम केले. अतः वीरशैव जन

प्रतिदिनीं धर्मसंस्थापक पंचाचार्यांच्या नामस्मरणाबरोबरच या धर्माचे प्रबल प्रचारक श्री महात्मा बसवेश्वरांचेहि चिंतन करतात.

**वीरशैव साहित्य व त्याचे रचनाकार**

सिद्धान्ताख्ये महातन्त्रे कामिकाद्ये शिवोदिते ।
निर्दिष्टमुत्तरे भागे वीरशैवमतं परम् ॥
(सि. शि. ५।१४, पृ. ५७)

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनानुसार वीरशैव साहित्याचा मूलस्रोत अठ्ठावीस आगम आहेत. या आगम साहित्यानंतर बहुतेक वीरशैव साहित्य अनुपलब्ध आहे. त्यापैकीं केवळ सिद्धान्तशिखामणि हा एकमात्र ग्रंथ उपलब्ध आहे. यांत श्री ज. रेणुकाचार्यांनी अगस्त्यमहर्षींना उपदेशिलेल्या वीरशैव सिद्धान्तांचे श्री शिवयोगी शिवाचार्यांनी संकलन केलें आहे. शिवयोगी शिवाचार्यांचा काल ख्रि. श. आठवें शतक मानला जातो. यानंतर अकराव्या शतकातील श्रीपति पण्डिताराध्यांनीं लिहिलेले 'ब्रह्मसूत्र श्रीकरभाष्य' सुप्रसिद्ध आहे. याशिवाय संस्कृत भाषेंत वीरशैव साहित्य अपार आहे. त्यापैकीं कांहीं प्रमुख ग्रंथकारांचीं नांवे पुढें दिलीं आहेत.

श्री मायिदेव यांचे अनुभवसूत्र व विशेषार्थप्रकाशिका, श्री नन्दिकेश्वर यांची 'लिंगधारणचंद्रिका', श्री स्वप्रभानन्दशिवाचार्यलिखित शिवाद्वैतमञ्जरी, श्री मरितोंटदार्यकृत वीरशैवानन्दचन्द्रिका, सिद्धान्तशिखामणीची तत्त्व-प्रदीपिका व्याख्या, कैवल्यसार प्रभृती ग्रंथ, केळदी बसव भूपालकृत शिवतत्त्व-रत्नाकर, श्री शंकरशास्त्रीकृत वीरशैवभाष्ययुक्त ईश, केन, मुण्डक, सिद्धान्त-शिखोपनिषत् ब्रह्मसूत्रवृत्ति, टी. जी. सिद्धप्पाराध्यकृत वीरशैवभाष्ययुक्त श्वेताश्वतरोपनिषत्, भगवद्गीता आणि शरणगीता, शक्तिविशिष्टाद्वैतदर्शन आदि, ईशानगुरु यांचे रेणुकचम्पू, सिद्धनाथ शिवाचार्यकृत रेणुकविजयचम्पू, वृषभलिंग शिवयोगी यांचा शिवप्रसंगरत्नाकर, सोसले रेवणाराध्य यांचा शिवाधिक्यशिखामणि, यलन्दूर षडक्षर कविकृत कविकर्णरसायन, निट्टूर

नञ्जणाचार्यंकृत वेदान्तसारवीरशैवचिन्तामणि, वृषभपण्डितशिवाचार्यांचे नारायणोपनिषद्भाष्य, मौनप्प पंडित यांचा वीरशैवाचारकौस्तुभ, त्रिलोचन शिवाचार्यं यांची सिद्धान्तसारावलि, शिवानुभव शिवाचार्यांचे 'शिवाद्वैतदर्पण', हूली नीलकंठशिवाचार्यंकृत शिवाद्वैतपरिशाषा, षडक्षरमन्त्री यांचा वीरशैव-धर्मशिरोमणि, गुलूर सिद्धवीरणार्यंकृत अनादिवीरशैवसारसंग्रह आदि संस्कृतचे शेकडो ग्रंथ आहेत. मराठीत श्री मन्मथस्वामींचे परमरहस्य, शांतलिंग-स्वामींचा कर्णहंस व अन्य ग्रंथ, शिवदास, शिवलिंग, लक्ष्मण, लिंगेश्वर व अन्य ग्रंथकारांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

कन्नड भाषेंत वीरशैवतत्त्वांचे प्रतिपादन करणारे श्री बसवेश्वर, प्रभुदेव, अक्कमहादेवि, देवरदासिमार्यं, सिद्धरामेश्वर, तोंटदसिद्धलिंगेश्वर, चन्नबसवे-श्वर आदि शरणांच्या वचनांचे विपुल वाङ्मय उपलब्ध आहे प्रमुख ग्रंथ व ग्रंथकारांचाच उल्लेख विस्तारभयास्तव केला आहे. संपूर्ण वीरशैव साहित्याच्या माहितीसाठी स्वतंत्र ग्रंथाच्या निर्मितीची आवश्यकता आहे. संभवतः तीहि पूर्ण होण्याची आशा आहे.

### ह्या ग्रंथाचा विषय

वरील सर्व ग्रंथात वीरशैव धर्माच्या 'अष्टावरण', 'पंचाचार' आणि 'षट्स्थल' या तीन तत्त्वांचें प्रामुख्यानें सन्दर्भानुसार प्रतिपादन केलें आहे. या धर्मीत अष्टावरणांना अंग, पंचाचारांना प्राण व षट्स्थलांना 'आत्मा' ही संज्ञा दिलेली आहे. ज्याप्रमाणें लोकांना कोणताहि व्यवहार व्यवस्थित करण्यासाठीं हात, पाय आदी अंगांची, पंचप्राण व आत्म्याची आवश्यकता असते, तद्वतच वीरशैव सिद्धांताच्या रीतीनें मुक्ति प्राप्त करण्यासाठी ह्या तिन्हीं तत्त्वांची आवश्यकता आहे. अतः हीं तीन तत्त्वें वीरशैव साधकाचे अंग, प्राण व आत्मा मानले जातात. प्रस्तुत ग्रंथात आम्हीं साधकाच्या अंग-रूपात वर्णन केलेले, ( १ ) गुरु, ( २ ) लिंग, ( ३ ) जंगम, ( ४ ) विभूति, ( ५ ) रुद्राक्ष, ( ६ ) मंत्र, ( ७ ) पादोदक आणि ( ८ ) प्रसाद या नांवांनी

प्रसिद्ध असलेल्या अष्टावरणाचे अंतरंग तथा बहिरंग स्वरूपाचें विवेचन शास्त्रीय आणि वैज्ञानिक पद्धतीनें केलें आहे.

**ग्रंथरचनेचे प्रयोजन**

वीरशैव धर्म-दर्शनाच्या ह्या सिद्धान्ताने सर्व भारतीयांना परिचित करण्यासाठीं राष्ट्रभाषेंत ( मूळ ) या ग्रंथाची रचना केली आहे. या धर्म-दर्शनाच्या तत्त्वजिज्ञासू लोकांसाठीं हा ग्रंथ अत्यंत उपयोगी होईल. अनुभवी वाचकांना ह्यांत जर कांही त्रुटी आढळल्या तर आम्हांस सूचित करण्याचे श्रम घ्यावेत; त्यायोगें पुढील आवृत्तीत त्याची सुधारणा केली जाईल. या ग्रन्थाच्या अध्ययनाने सामान्य वाचकांना थोडा लाभ जरी मिळाला, तर आमचे परिश्रम सार्थकी लागले, असे आम्हीं समजूं.

गणेश चतुर्थी, १९०७ श. सं. — विद्वज्जनविधेय

वाराणसी ( १८-९-१९८५ ) — चन्द्रशेखरशिवाचार्य

# मङ्गलाचरण

ॐ नमो लिङ्गरूपाय जगज्जन्मादिहेतवे ।
निगमागमवेद्याय भक्तसिद्धिप्रदायिने ॥ १ ॥

नमः शिवायै शिववल्लभायै शिवानुभूतिप्रतिभाकलायै ।
शिवप्रसादामलविग्रहायै शिवप्रदायै भवतादुमायै ॥ २ ॥

शिवस्य तत्त्वं शिव एव वेत्ति नन्दी च विष्णुर्नगजाकुमारः ।
शिवप्रसादाच्छिवतत्त्वमापुस्तेभ्यो नमः शङ्करतत्त्वविद्भ्यः ॥ ३ ॥

पञ्चाचार्यान् नमस्कुर्वे पञ्चसिंहासनाधिपान् ।
पञ्चब्रह्ममयान् पञ्चतत्त्वाधीशान् जगद्गुरून् ॥ ४ ॥

विश्वेशलिङ्गसंभूतं विश्वविद्याविबोधकम् ।
विश्ववन्द्यं सदा वन्दे विश्वाराध्यं जगद्गुरुम् ॥ ५ ॥

श्रीरेणुकार्यं गुरुवर्यमीडे भक्तौघसंरक्षणबद्धकक्ष्यम् ।
मदीयहृत्पद्मविराजमानः सोऽयं गुरुर्ग्रन्थमिमं तनोति ॥ ६ ॥

श्रीवीरगोत्रोत्थित एष भृत्यः श्रीरेणुकाचार्यवरप्रसादात् ।
वीरेशयोगान्न च बुद्धिलोभाल्लब्धाधिकारोऽत्र हि संप्रयुङ्क्ते ॥ ७ ॥

अष्टावरणसम्पन्नः पञ्चाचारपरायणः ।
वैदिकं कर्म कुर्वीत ज्ञानैकफलसाधनम् ॥ ८ ॥

—

## वीरशैव

# अष्टावरण-विज्ञान

"आव्रियते देहादिकं येन तद् आवरणम्" ही आवरण शब्दाची व्युत्पत्ति आहे. झांकणें, लपविणें, घेरणें आदि अनेक अर्थ होतात. आवरणाचे दोन प्रयोजन आहेत. प्रथम--कोणाला वस्तूचें वास्तविक ज्ञान न होऊं देणें व दुसरें सर्वप्रकारच्या विनाशकारी शक्तींपासून रक्षण करणें. या प्रकारें आवरण शब्दाचें, स्वरूपाच्चें आच्छादन व रक्षणाचें कवच असे दोन्ही अर्थ सिद्ध होतात दार्शनिक व लौकिक व्यवहारांत दोन्ही दृष्टींनी याचा प्रयोग केलेला आढळतो.

वेदान्त शास्त्रांत अंगीकृत अज्ञानांत दोन शक्ती असतात. पहिली आवरण-शक्ति व दुसरी विक्षेपशक्ति. हें अज्ञान आपल्या द्विविध शक्तींच्या बळानें देह, मन, बुद्धि, चित्त, अहंकार, ज्ञाता व मायेच्या रूपांत आत्म्यास आवृत करतें. कर्नाटकातील वेदान्त आणि वीरशैव सिद्धान्ताचे महाज्ञानी सुप्रसिद्ध श्री निजगुणशिवयोगी यांनीं उपर्युक्त या देहादींना, आपल्या 'परमानुभवबोधे' नांवाच्या ग्रंथात, आत्म्याचें आवरक सप्तावरण म्हटलें आहे; आणि यात असलेल्या ममत्वास दूर सारण्यासाठीं यम-नियम आदि अष्टांग उपाय सांगितले आहेत

सांख्यशास्त्रातसुद्धां सप्तावरणांचा स्वीकार करण्यांत आला आहे. माया, प्रकृति, महत्तत्त्व, अहंकार, पंचतन्मात्रा, पंचमहाभूतें आणि भौतिक पदार्थ. यांत भौतिक पदार्थ पंचमहाभूतांना, पंचमहाभुतें तन्मात्रांना, तन्मात्रा अहंकारास, अहंकार महत्तत्त्वास, महत्तत्त्व प्रकृतीस आणि प्रकृति मायेला याप्रमाणें उत्तरोत्तर पूर्वीपूर्वीच्या स्वरूपाचे आवरक असल्यामुळें त्यांना सप्तावरण म्हटलें आहे.

योगशास्त्रांत सांगितलेले यम, नियम, आसन, प्राणायाम; प्रत्याहार; ध्यान, धारणा व समाधि हीं अष्टांगें साधकाच्या, देह, मन व बुद्धीचें संरक्षण करून परमतत्त्वाच्या साक्षात्कारांत सहाय्यक होतात. अतः यांचा 'रक्षाकवच' या अर्थानें 'अष्टावरण' शब्दाशीं व्यवहार केला जाऊ शकतो. परंतु योगशास्त्रांत याला 'अष्टाङ्गयोग' म्हटलें आहे.

आवरण शब्दाचा दुसरा अर्थ 'रक्षाकवच' असा आहे. त्या अर्थीं या शब्दाचा वापर वीरशैव आचार्यांनीं केला आहे; हें एक वैशिष्टच आहे. हा व्यवहार आगमशास्त्राला सम्मत आहे—

गुरुर्लिङ्गं जङ्गमश्च तीर्थं चैव प्रसादकः ।
भस्मरुद्राक्षमन्त्राश्चेत्यष्टावरणसंज्ञिताः ॥
इमानि शिवभक्तानां भवदोषततेः सदा ।
निवारणैककार्याणि ख्यातान्यावरणाख्यया ॥

( चन्द्र. क्रियापाद. २।१-२ )

चन्द्रज्ञान आगमाच्या या वचनांत ( १ ) गुरु, ( २ ) लिंग, ( ३ ) जंगम, ( ४ ) पादोदक, ( ५ ) प्रसाद, ( ६ ) विभूति, ( ७ ) रुद्राक्ष आणि ( ८ ) मन्त्र, या आठांना अष्टावरण म्हटलें जातें. ज्याप्रमाणें युद्धभूमीवर योद्धा शत्रूच्या शस्त्रप्रहारापासून आपल्या शरीराचें रक्षण करण्यासाठीं कवच धारण करतो, अथवा शेतातील पिकाचें जनावरांपासून रक्षण करण्यासाठीं चहूंकडे कुंपण लावून पिकाचें ज्याप्रमाणें रक्षण केलें जातें, तद्वतच दीक्षा प्राप्त झालेल्या भक्ताचें काम, क्रोध आदि दुष्ट वृत्तींपासून या आवरणामुळें रक्षण होतें. म्हणून त्यांना अष्टावरण म्हणतात. हीं आठ आवरणें मोक्षप्राप्तीसाठीं सहाय्यक बनतात. यांत गुरु, लिंग व जंगम हे तीन पूजनीय आहेत. विभूति, रुद्राक्ष व मन्त्र हीं तीन पूजेचीं साधनें आहेत, आणि पादोदक व प्रसाद हीं पूजेचीं दोन फळें होत. आतां आम्हीं क्रमशः या अष्टावरणांचें विस्तृत विवेचन करतों.

# १. श्री गुरु

आमच्या भारतीय संस्कृतीत श्री गुरुला अग्रस्थान दिलें गेलें आहे. गुरुशिवाय कोणी कांहींच शिकू शकत नाहीं. जगात असा कोणताच संप्रदाय नाहीं, कि जो गुरुला मानीत नाहीं. "साक्षाद् भर्गो नराकृतिः" या वचनाच्या आधारें भारतीय जन गुरुला ईश्वराचाच अवतार मानतात. योगशास्त्राचे प्रणेते महर्षि पतञ्जलि यांनीं "पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्" ( यो. सू. १।२६ ) या योगसूत्रात ईश्वरालाच पहिला गुरु मानलें आहे. स्वाति नक्षत्राच्या पाण्यानेंच मोती तयार होतो, परंतु त्या पाण्यापेक्षां मोत्याचीच किंमत अधिक असते, तद्वतच ईश्वरच गुरु झाल्यावर गुरुचे स्थान ईश्वरापेक्षाहि श्रेष्ठ होतें. म्हणूनच सन्त कबीरदासांनीं म्हटलें आहे—

गुरु-गोविंद दोऊ खड़े काकू लागूँ पाँय।
बलिहारी गुरु आपकी गोविंद दियो मिलाय ॥

कन्नडचे महात्मा बसवेश्वरांनींही म्हटलें आहे—'शिवपथव नरिवडे गुरुपथवे मोदलु' अर्थात् शिवस्वरूप जाणण्यासाठीं गुरुलाच शरण जावें लागतें. या सर्व गोष्टी हृदयस्थ करून श्री जगद्गुरु रेणुकाचार्यांनीं श्री अगस्त्य महर्षींना गुरुचें लक्षण पुढीलप्रमाणें सांगितलें आहे-

गुणातीतं गुकारं च रूपातीतं रुकारकम् ।
गुणातीतमरूपं च यो दद्यात् स गुरुः स्मृतः ॥

( सि. शि. १५।८, पृ. ४९ )

येथें गुरु या दोन अक्षरांचा अर्थ सांगतात कीं, 'गु'चा अर्थ—प्राकृत सत्त्वादिगुणातीतत्व आणि 'रु'चा अर्थ—अशुद्धमायारूपरहितत्व. याप्रकारें निर्गुण व निराकार परशिवचैतन्य जो उपदेशाद्वारें शिष्यास समजावून सांगतो त्याला गुरु म्हणतात.

प्रत्येक सम्प्रदायात गुरुपरंपरेत कांही विशेषता असते. तद्वतच वीरशैव सम्प्रदायातही गुरुपरम्परा समजावून घेतली पाहिजे. गुरुपरंपरा विशद करतांना क्रियासार ग्रंथातं सांगितले आहे कीं—

मठस्थलसमुत्पन्नः शान्तः शैवागमार्थवित् ।
अनूचानः प्रसन्नात्मा शिवदीक्षाभिषेचितः ।।

( क्रियासार, भाग ३, पृ. १३३ )

"मठस्थलसमुत्पन्नः" या शब्दानें येथें सांगितलें आहे कीं, हिरेमठ, पुराण-मठ, स्थावरमठ इ. उपाधि असलेल्या जंगमवंशात ज्याचा जन्म झाला आहे, आणि ज्याला वीरशैव परंपरेनुसार कोणत्याहि एका गुरुवर्गाच्या मठावर पट्टाभिषेक करण्यात आला आहे, आणि ज्याला 'शिवाचार्य' ही उपाधि दिली गेली आहे, त्याला गुरु म्हणतात.

दीक्षा प्राप्त करून घेण्यासाठीं कोणत्या गुरुस शरण जावें ? अगस्त्यांच्या या प्रश्नाच्या उत्तरांत श्री जगद्गुरु रेणुकाचार्यांनीं गुरुचे लक्षण पुढीलप्रमाणें सांगितलें आहे—

उपैति लोकविख्यातं लोभमोहविवर्जितम् ।
आत्मतत्त्वविचारज्ञं विमुक्तविषयभ्रमम् ।।
शिवसिद्धान्ततत्त्वज्ञं छिन्नसन्देहविभ्रमम् ।
सर्वतन्त्रप्रयोगज्ञं धार्मिकं सत्यवादिनम् ।।
कुलक्रमागताचारं कुमार्गाचारवर्जितम् ।
शिवध्यानपरं शान्तं शिवतत्त्वविवेकिनम् ।।
... ... ...
लिङ्गधारणसंयुक्तं लिङ्गपूजापरायणम् ।।
लिङ्गाङ्गयोगतत्त्वज्ञं निरूढाद्वैतवासनम् ।
लिङ्गाङ्गस्थलभेदज्ञं श्रीगुरुं शिववादिनम् ।।

( सि. शि. ६।२–७, पृ. ८२-८३ )

येथें लोभ आदि दुर्गणरहितत्व, लिंगधारणयुक्तत्व, लिंगपूजापरायणत्व आदींची योग्यता सांगतांना "कुलक्रमागताचारं" असें सांगून जंगमवंशपरंपरे-

सही महत्त्व दिले गेले आहे. केवळ जंगमवंशात जन्म घेतला म्हणून त्याला गुरुची योग्यता प्राप्त होत नाहीं. तर त्याला वर उल्लेखलेली योग्यताहि असावी लागते. उत्तम वंशात जन्म आणि सद्‌गुणयुक्तत्व असलें तर सोन्यात सुगन्धाप्रमाणें होतें.

वीरशैवांची ही गुरुपरंपरा परशिवाच्या सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान या पांच मुखापासून उत्पन्न झालेले रेवणसिद्ध, मरुळसिद्ध, एकोरामाराध्य, पण्डिताराध्य, विश्वाराध्य नांवाच्या भुवनप्रसिद्ध पंचाचार्यांच्याद्वारें प्रवृत्त झाली आहे. या पंचाचार्यांनी युगारंभीं प्रादुर्भूत होऊन वीरशैव मताची स्थापना केली आहे. त्यांना महाचार्य अथवा जगद्‌गुरु म्हणतात. यासंबंधीची चर्चा यापूर्वीच करण्यांत आली आहे.

वीरशैव गुरु-परंपरेत येणारे महाचार्य आणि शिवाचार्य दोघेही यावज्जीव नैष्ठिक ब्रह्मचारी असतात. वीरशैव संप्रदायात कांहीं असेही शिष्यवर्गाचे मठ आहेत कीं जेथें गुरु आपल्या भक्तवंशात जन्मलेल्या सुयोग्य, सद्‌गुणी व्यक्तीला जंगमदीक्षा देऊन आपल्या मठाचा उत्तराधिकारी करून घेतात. अशाप्रकारच्या गुरुंना वीरशैवांच्या गर्भाष्टम मासात लिंगधारणेपासून अन्त्येष्टीपर्यंत सर्वच धार्मिक कार्यें संपन्न करविण्याचा अधिकार आहे. अन्य कोणास नाहीं.

ह्याप्रसंगी एक विशेष गोष्ट समजून घेतली पाहिजे कीं, वीरशैवांच्या एका परिवाराच्या सर्व व्यक्तींचा एकच गुरु असतो. सूक्ष्मागमांत म्हटलें आहे कीं—

पितृ-भ्रातृ-कलत्राणां पुत्रादीनां तथैव च ।
दीक्षा-शिक्षाविधानार्थमेक एव गुरुर्भवेत् ॥
गुरवो यत्र बहवो भवन्त्यन्योन्यभेदतः ।
वीरशैवसदाचारस्तत्र नास्तीति निश्चयः ॥

( सू. आ. ५।२९-३० )

या आगमाच्या वचनाचें तात्पर्य असें आहे कीं, माता, पिता, भ्राता, पुत्र आदींचे जर गुरु भिन्न भिन्न असल्यास सदाचाराची हानि होते. म्हणून

त्या सदाचाराच्या पालनासाठी परिवाराच्या सर्व व्यक्तींचा एकच गुरु असला पाहिजे.

गुरु एक असूनसुद्धां दीक्षा, शिक्षण तथा ज्ञानोपदेश केल्यानें दीक्षागुरु, शिक्षागुरु आणि ज्ञानगुरु या नावांनी संबोधला जातो.

## दीक्षागुरु

दीयते परमं ज्ञानं क्षीयते पाशबन्धनम् ।
यया दीक्षेति सा तस्यां गुरुर्दीक्षागुरुः स्मृतः ॥
( सि. शि. १५।७, पृ. ४८ )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनानुसार आपल्या वंशाचा जो परंपरागत गुरु अशी दीक्षा प्रदान करतो, ज्यामुळें शिष्याला शिवज्ञानाची प्राप्ति आणि त्याचे आणव आदि मलत्रयाचा नाश होतो, त्याला दीक्षागुरु म्हणतात.

वीरशैव धर्मात सर्व व्यक्तींना दीक्षा घेणें अनिवार्य आहे. या दीक्षेत पट्टाभिषिक्त शिवाचार्य आपल्या गोत्राच्या शिष्यांना 'इष्टलिंग' प्रदान करून पंचाक्षरी मंत्राचा उपदेश करतो. या दीक्षेचा पुरुष व स्त्रियांना समान अधिकार आहे.

जन्मानंतर आठव्या वर्षीं दिली जाणारी दीक्षा उत्तम मानली जाते. सोळाव्या वर्षांत दिली जाणारी दीक्षा मध्यम दीक्षा आणि त्यानंतर दिली जाणारी दीक्षा अधम समजली जाते.[1]

वीरशैव सिद्धान्तात दीक्षेशिवाय कोणीच मोक्षाचा अधिकारी होऊ शकत नाही. अतः "अथाऽतो ब्रह्मजिज्ञासा" या व्याससूत्राच्या व्याख्येत वीरशैव भाष्यकार श्रीपतिपण्डिताराध्यांनी 'अथ' शब्दाचा "दीक्षेद्वारें इष्टलिंगधारण आणि अष्टावरणांच्या प्राप्तीनंतर" असा अर्थ केला आहे.[2]

दीक्षेशिवाय केलेली इष्टलिंगपूजा शिवार्पित होत नाहीं. म्हणूनच महाराष्ट्रातील सन्तशिरोमणि मन्मथस्वामींनी म्हटलें आहे—

---

१. पहा—वी. स. सं. ११।२.
२. पहा—ब्र. सू. श्रीकर. १।१।१.

शिवदीक्षा झाल्याविण । जो मूढ करी शिवपूजन ।
तो पामर जीव म्हणून । देव पूजन न घेती त्याचे ।।
दीक्षावन्त भक्त पवित्र । सदा मुखीं जपे शिव मंत्र ।
तो असे स्वतन्त्र । शिवानुष्ठाना करणे ।।
( परमरहस्य, ७।९०-९१; पृ. ७८ )

दीक्षाबोध नांवाच्या ग्रंथातही सांगितलें आहे कीं—

त्रिपुण्ड्रं चैव रुद्राक्षं नित्यार्चनजपं तथा ।
होमध्यानादिकं सर्वं दीक्षाहीनस्य निष्फलम् ।।
यथा मृगपतिं दृष्ट्वा भीतो याति वने गजः ।
अदीक्षितोऽर्चयेल्लिङ्गं तथैवाहं महेश्वरि ।।

तात्पर्य, दीक्षेशिवाय केल्या जाणाऱ्या सर्व धार्मिक क्रिया निष्फल होतात. इतकेंच नव्हे, तर ज्याप्रमाणें सिंहाला पाहून हत्ती पळून जातो, त्याप्रमाणें अदीक्षित व्यक्ति पूजा करण्यासाठीं आल्यास शिव पलायन करतात.

या सर्व गोष्टी लक्षांत घेतां, हाच निष्कर्ष निघतो कीं, वीरशैव सम्प्रदायात आध्यात्मिक साधनेसाठीं प्रवृत्त झालेल्या सर्व साधकांचा दीक्षा एक अनिवार्य आणि अत्यंत आवश्यक संस्कार आहे.

स्वाती नक्षत्रांत शिंपल्यात पडलेल्या पाण्याचा मोती बनतो, पुन्हां त्याचें पाणी होत नाहीं, तद्वतच दीक्षा प्राप्त झालेला जीव पुन्हां भवचक्रांत येत नाहीं. त्याचा हाच जन्म अन्तिम होय.[1]

दीक्षा प्राप्त करण्याचा अधिकार सर्वांनाच स्वभावतः प्राप्त होत नाहीं. तर अनेक जन्मांत नित्यनैमित्तिक कर्म केल्यामुळें ज्याचे आणव आदि मलत्रय पक्व झालेले आहेत, आणि ज्याच्यावर ईश्वरानुग्रहरूप शक्तिपात झालेला आहे, त्यालाच दीक्षेचा अधिकार प्राप्त होतो. 'तत्त्वप्रकाश' ग्रन्थाच्या वचनांत—

परिपक्वमला ये तानुत्सादनहेतुशक्तिपातेन ।
योजयति परे तत्त्वे स दीक्षयाचार्यमूर्तिस्थः ।। ( श्लो. १५ )

---

१. पहा—वी. स. सं. ११।३–७.

येथें हें रहस्य आहे कीं, "मलोऽप्यामश्च पक्वश्च भवेत् संसारकारणम्" ( शिव पु. ७।१।३१।७२ ) या शिवपुराणांतील उक्तीनुसार जीवाचे जनन-मरणरूप संसारास कारणीभूत आणव आदि मलांचे 'आम' आणि 'पक्व' नावांचे दोन भेद असतात. अनेक जन्मांतील तपस्येमुळें ज्याचे मल क्षीण होतात, त्या मलास पक्वमल म्हणतात. त्या विपरित असलेल्यास आममल म्हणतात. आममल असलेला दीक्षेचा अधिकारी होऊ शकत नाहीं. पक्वमल असलेला शिवानुग्रहरूप शक्तिपात संपन्न झाल्यामुळें दीक्षा ग्रहण करण्याचा अधिकारी बनतो. 'सिद्धान्तशिखामणि' ग्रन्थात "शक्तिपातं समालोक्य दीक्षया योजयेदमुम्" ( सि. शि. ६।१०, पृ. ८५ ) असें म्हटलें आहे.

वीरशैव सिद्धान्तात जीवात्म्याचे, स्थूल, सूक्ष्म आणि कारण ( त्यागांग, भोगांग आणि योगांग ) शरीरात वास करणारे आणव आदि त्रिविध मलांच्या निवृत्तीसाठीं तीन प्रकारच्या दीक्षांचें विधान केले गेले आहे—

सा दीक्षा त्रिविधा प्रोक्ता शिवागमविशारदैः ।
वेधरूपा क्रियारूपा मन्त्ररूपा च तापस ॥
( सि. शि. ६।१२, पृ. ८५ )

या सिद्धान्तशिखामणीच्या आधारावर त्रिविध दीक्षांची नांवें—वेधदीक्षा, क्रियादीक्षा आणि मन्त्रदीक्षा अशीं आहेत.

## वेधदीक्षा

गुरोरालोकमात्रेण हस्तमस्तकयोगतः ।
यः शिवत्वसमावेशो वेधदीक्षेति सा मता ॥
( सि. शि. ६।१३, पृ. ८६ )

श्री जगद्गुरु रेणुकाचार्यांच्या या वचनानुसार गुरु प्रथमतः शिष्याचें आपल्या शिवावह दृष्टीनें निरीक्षण करतो; आणि आपल्या हाताचा शिष्याच्या मस्तकास स्पर्श करतो. या स्पर्शाचा मूळ उद्देश शिष्यामध्यें शिवत्वाचा समावेश करणें हा होय. ह्या हस्तमस्तकसंयोगरूप क्रियेमुळें त्या क्षणीं

शिष्याला शिवस्वरूपाचा आभास होतो. अर्थात् "मी शिव आहें" असा अनुभव होतो. वस्तुतः ही "शिवोऽहं" भावनाच भावलिंग होय. गुरुकृपेनें प्राप्त झालेल्या ह्या भावलिंगानुभवास शिष्य पुन्हां आपल्या साधनेनें दृढ करतो. यामुळें त्याच्या "मी अणु आहे" ( मी लहान आहे ) या आणवमलाची निवृत्ति होते. गुरुनें केलेला आणवमलनिवारक चिन्मयस्वरूपाचा उपदेशच "वेधदीक्षा" होय.

## मन्त्रदीक्षा

"मान्त्री दीक्षेति सा प्रोक्ता मन्त्रमात्रोपदेशिनी" ( सि शि. ६।१४, पृ. ८६ ) ह्या आचार्योक्तीनुसार शिष्याच्या उजव्या कानांत अत्यन्त गुप्तपणें शिवमय पंचाक्षर मंत्राचा उपदेश देणें हीच मन्त्रदीक्षा होय. ह्या दीक्षेत उपासना अथवा मनन करण्यासाठीं शिवाच्या मंत्रमय स्वरूपाचा उपदेश केला जातो. श्री शिव पंचाक्षरी मन्त्रस्वरूपी आहेत. म्हणून त्या मंत्राच्या आवर्तनानें तथा तदाकार मनन करण्यानें माया नांवाच्या मलाची निवृत्ति होते. मन्त्रोपदेशानंतर गुरु शिष्याच्या हृदयांत प्रकाशरूप प्राणलिंगाचा बोध करतो. याप्रकारें मायामलाची निवृत्ति व प्राणलिंगाचा बोध हेंच या दीक्षेचें प्रयोजन होय.

## क्रियादीक्षा

"कुण्डमण्डलिकोपेता क्रियादीक्षा क्रियोत्तरा"

( सि. शि. ६।१५, पृ. ८६ )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनानुसार शुभमुहूर्तावर मठ अथवा मंदिर अशा पवित्र ठिकाणीं मण्डप तयार करून त्यांत कलशस्थापनापूर्वक मण्डलरचना, मूर्तिपूजा आदि केली जाते. वीरशैव मतात पंचकलश स्थापन करण्याचें विधान आहे. गुरु आपल्या आम्नायानुसार प्रथम त्या पांच कलशांत वीरशैवांचीं पंचसूत्रें तथा गोत्रांचे मूळ प्रवर्तक श्री रेवणाराध्य, श्री मरुळाराध्य, श्री एकोरामाराध्य, श्री पण्डिताराध्य आणि श्री विश्वाराध्य ह्या पांच आचार्यांचे आवाहन करून त्यांच्या साक्षीनें शिष्याला आपल्या समोर बसवून

पंचगव्यप्राशन, अभिषेक आदींनी त्याचें शरीर शुद्ध करतो.[१] या शुद्ध शरीरास मन्त्रपिण्ड म्हणतात. अशाप्रकारें अंगशुद्धीनंतर शिलामय पंचसूत्र प्रक्रियेनें निर्मित शिवलिंगात शिलात्वाच्या निवृत्तीसाठी जलाधिवास, धान्याधिवास आदि अधिवासक्रिया सम्पन्न केली जाते. यानंतर त्या शिवलिंगात शिवकलानियोजनाद्वारें प्राणप्रतिष्ठा केली जाते.[२]

तें सुसंस्कारित शिवलिंग ( इष्टलिंग ) शिष्याच्या हातीं देऊन गुरु ही शिक्षा देतो—

प्राणवद्धारणीयं तत् प्राणलिङ्गमिदं तव ।
कदाचित् कुत्रचिद्वापि न वियोजय देहतः ।।
( सि. शि. ६।५, पृ. ९० )

इष्टलिंग आपल्या प्राणाप्रमाणें नेहमीं गळयात धारण केलें पाहिजे. केव्हांहि लिंगाचा देहापासून वियोग होऊ नये. हया शिक्षणानंतर गुरु पंचाक्षरीमन्त्राचा उपदेश करतात. शिवाय त्या मन्त्राचे छंद, ऋषि आणि देवतेचे ज्ञान करवून न्यास-पद्धतीहि शिकवितात.[३]

याप्रकारें इष्टलिंगधारणेसाठीं केला जाणारा संस्कारच 'क्रिया-दीक्षा' म्हणविला जातो. या दीक्षेमुळें जीवाचा कार्म मल, अर्थात् संचित कर्म तथा अशुभ वासना नष्ट होऊन जातात.[४]

याप्रमाणें त्रिविधा दीक्षेद्वारें शिष्याच्या स्थूल, सूक्ष्म आणि कारण-शरीरांत राहणारे आणव आदि त्रिविध मल दूर करून इष्ट, प्राण तथा भावलिंगाचा उपदेश देणाऱ्या गुरुला दीक्षागुरु म्हणतात.

---

१. पहा—सि. शि. ६।१५–१९, पृ. ८६-८७.
२. पहा—वी. स. सं. १०।४७-६८.
३. सि. शि. ६।२०-२१, पृ. ८७-८८.
४. पहा—अनु. सू. ५।४१, ५८-५९.

## शिक्षागुरु

दीक्षागुरुरसौ शिक्षाहेतुः शिष्यस्य बोधकः ।
प्रश्नोत्तरप्रवक्ता च शिक्षागुरुरितीर्यते ॥
( सि. शि. १५।१, पृ. ५० )

या आचार्यांच्या उक्तीनुसार जो दीक्षागुरु दीक्षेनंतर लिंगपूजेचे नियम आणि इष्टलिंग प्राणाप्रमाणें अत्यन्त सावधानतापूर्वक निरन्तर शरीरावर धारण करण्याचें शिक्षण देतो, त्याचबरोबर मन्त्रसाधना, प्राणलिंगानुसन्धानाची पद्धति शिकवितो, त्याच्या नियमाच्या अनुशासनावर जोर देतो त्याला शिक्षागुरु म्हणतात.[1]

## ज्ञानगुरु

उपदेष्टोपदेशानां संशयच्छेदकारकः ।
सम्यग्ज्ञानप्रदः साक्षादेष ज्ञानगुरुः स्मृतः ॥
( सि. शि. १५।१, पृ. ५२ .

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनानुसार जो वीरशैव आगम-प्रतिपादित विषयांना आपला अनुभव आणि अनेक युक्त्यांद्वारें प्रतिपादित करून शिष्याचा संशय दूर करून जीवन्मुक्तीच्या हेतूनें शिवाद्वैताचा उपदेश करतो, त्याला ज्ञानगुरु[2] म्हणतात.

अशाप्रकारें आपल्या परिवाराच्या वंशपरंपरागत एकाच गुरुला, दीक्षा, शिक्षा तथा ज्ञानोपदेश करण्याच्या कारणामुळें दीक्षागुरु, शिक्षागुरु आणि ज्ञानगुरु अशी संज्ञा मिळते. हा गुरु दीक्षादि संस्कार तथा ज्ञानोपदेशाद्वारें या भवारण्यांत राहणाऱ्या काम, क्रोध आदि दुष्ट प्रवृत्तींपासून शिष्याचें रक्षण करतो. अतः वीरशैवांच्या अष्टावरणांत गुरुचें प्रथम स्थान आहे.

—

१. पहा–सि. शि. १५।१–९, पृ. ५०–५२.
२. पहा–सि. शि. १५।१–९, पृ. ५३–५६.

# २. लिंग

लयं गच्छति यत्रैव जगदेतच्चराचरम् ।
पुनः पुनः समुत्पत्तिं तल्लिङ्गं ब्रह्म शाश्वतम् ।।

( सि. शि. ६।१६; पृ. ९३ )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनानुसार विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लयास कारणीभूत असलेल्या परशिवास लिंग म्हटलें जातें. वृहत् अर्थात् व्यापक स्वरूप असल्यामुळें याला ब्रह्मही म्हणतात. अर्थात् लिंग व ब्रह्म दोन्हीं पर्याय आहेत. "ब्रह्मेति लिङ्गमाख्यातं ब्रह्मणः पतिरीश्वरः" लिंगपुराणातील या वचनावरून ही गोष्ट सिद्ध होते. या परमतत्त्वास लिंग अशाकरितांहि म्हटलें जातें कीं, शिवयोगी अविद्या आदि पंचक्लेश आणि आणवादि मलत्रयरूपी पाशापासून निर्मुक्त होऊन अन्तीं याच परमतत्त्वांत विलीन होऊन जातात. लिंग शक्तिविशिष्ट शिवाचें द्योतक आहे. स्थूल रूपानें ह्या लिंगात "वाण" आणि "पीठ" हे दोन भाग असतात. वाण शिवाचें व पीठ हें शक्तीचें चिन्ह आहे. या दोहोंचें संयुक्तस्वरूप म्हणजेच लिंग.[१]

हें लिंग उपासकांच्या दृष्टीनें स्थूल, सूक्ष्म आणि परात्पर भेदामुळें तीन प्रकारचें आहे. ह्यांनाच वीरशैव दर्शनामध्यें इष्टलिंग, प्राणलिंग व भावलिंग संबोधिलें जातें[२]

---

१. पीठिका परमा शक्तिर्लिङ्गं साक्षात् परः शिवः ।
शिवशक्तिसमायोगं विश्वं लिङ्गं तदुच्यते ।।

( सि. शि. ११।८, पृ. २०२ )

२. लिङ्गं तु त्रिविधं प्रोक्तं स्थूलं सूक्ष्मं परात्परम् ।
इष्टलिङ्गमिदं स्थूलं यद् बाह्ये धार्यते तनौ ।।

( सि. शि. ६।२८, पृ. ९६ )

## इष्टलिंग

हें लिंगाचें स्थूल स्वरूप आहे. स्फटिक अथवा सामान्य शिलेपासून ह्याची निर्मिती करतात. हें पंचसूत्राच्या परिमाणानें बनविलें जातें. त्याचें विधान असें आहे—सामान्यतः लिंगात बाण, पीठ आणि गोमुख असे तीन भाग असतात. वरील गोलाकारास बाण, त्या बाणाखालील आश्रयभूत भागास पीठ, आणि जलहरीस गोमुख म्हटलें जातें. शिलामय लिंग निर्माण करतांना प्रथम बाण तयार करून त्या बाणाच्या वर्तुळ परिमाणसदृश पीठाची लांबी आणि पीठाच्या वरील भागाची व खालील भागाची रुंदी असली पाहिजे. बाणाच्या वर्तुळाच्या निम्म्या मापाचें गोमुख तयार केलें पाहिजे. अशाप्रकारें बाणाचें वर्तुळ, पीठाची लांबी व पीठाच्या वरीलभागाची रुंदी व पीठाच्या खालील भागाची रुंदी हीं चारही मापें समान असायला हवीत. गोमुखाचें माप बाणाच्या वर्तुळाच्या निम्मे असलें पाहिजे. हीच पंचसूत्र प्रक्रिया होय. या प्रक्रियेने निर्माण केलेल्या लिंगासच 'पंचसूत्रलिंग' म्हटलें जातें.[1]

या पंचसूत्र परिमाणांत न्यूनाधिक्य ( कमी अथवा अधिक ) असल्यास, म्हणजे जर बाण अधिक परिमाणाचा असल्यास त्या लिंगाच्या पूजेनें अपमृत्यु, आणि पीठाचें परिमाण अधिक असलें तर धनाचा क्षय होतो, असें सांगितलें गेलें आहे. बाण व पीठाचें प्रमाण समान असलें तरच त्या लिंगापासून भोग तथा मोक्षाची प्राप्ति होते.[2]

अंगुष्ठ-मात्र ( परिमाण ) अशा या पंचसूत्र लिंगास क्रियादीक्षेच्या वेळीं गुरु अभिषेक आदि संस्कारांनीं शुद्ध करून प्राणप्रतिष्ठेच्याद्वारें पंचाक्षरी मन्त्रासहित जेव्हां शिष्यास देतो, तेव्हां त्याला इष्टलिंग म्हणतात.

---

१. लिङ्गवृत्तसमं पीठं दैर्घ्यं विस्तार एव च ।
( वीरशैवाचारप्रदीपिका; १।९४-९५ )

२. लिङ्गाधिक्ये भवेन्मृत्युः शक्त्याधिक्ये धनक्षयः ।
लिङ्गशक्त्योः समत्वं हि भोगमोक्षफलप्रदम् ॥
( क्रियासार, भा. ३, पृ. ४१ )

हें लक्षांत ठेवणें आवश्यक आहे कीं, जर कोणी गुरुशिवायच पंचसूत्र लिंग बाजारातून विकत घेऊन स्वतःच धारण करून घेतलें, तर तें असंस्कारित लिंग इष्टलिंग म्हणविले जाणार नाहीं. पारमेश्वरागमांत सांगितलें आहे कीं,—

विना विधानमीशानि ! न कुर्याल्लिङ्गधारणम् ।
कृतं चेदकृतं विद्धि न तच्छैवमतं भवेत् ।।

( पा. त. १।७७ )

गुरुच्या हातून प्राप्त झालेल्या या लिंगास इष्टलिंग म्हणण्याचें तात्पर्य असे कीं, इष्ट, अर्थात् अभीष्टाची, जी लिंगांगसामरस्यरूप मुक्ति आहे, प्राप्ती-मध्यें साधन आहे, आणि अनेक जन्मांच्या हेतुभूत संचितकर्मरूप अनिष्टाचीही निवृत्ती याच्यामुळेंच होते. म्हणून याला 'इष्टलिंग' म्हटलें आहे.[1]

गुरुकृपेशिवाय स्वतःच असंस्कृत शिवलिंग धारण करणारा चाण्डाळ समजला जातो. मृत्यूनंतर त्याला नरक प्राप्त होतो. म्हणून म्हटलें आहे कीं—

यो विना गुरुकारुण्यमिच्छया लिङ्गधारणम् ।
स जीवन्नेव चाण्डालो मृतो नरकमश्नुते ।।

( पा. त. १।७३ )

श्री गुरुकृपेनें प्राप्त झालेल्या अंगुष्ठ परिमाणाच्या त्या इष्टलिंगास सुवर्ण, चांदी, पितळ, तांबे इ. उत्तम धातूंनी बनलेल्या सज्जिकेत, कि जी शिवलिंग, नन्दीश्वर, आम्रफल, बिल्वफल अथवा मोदकाकार असें छोटेसें मंदिर असतें, त्यात ठेवून, शुभ्र, लाल, काळा, पिवळा तथा चित्र वर्णाच्या शिवसूत्रांत,[2] इच्छेनुसार कोणत्याहि एकाचा परिग्रह करून इष्टलिंगाच्या मंदिररूपी त्या सज्जिकेशी संलग्न करून

---

१. इष्टलिङ्गमिदं साक्षादनिष्टपरिहारकम् ।
धारयेदवधानेन शरीरे सर्वदा बुधः ।। ( सि. शि. ६।२९, पृ. ९६ )

२. शुक्लो ज्ञानप्रदस्तत्र रक्तो वश्यकरो गुणः । श्यामः शत्रुभयङ्करः पीतः पुत्रप्रदायकः ।। चित्रो विचित्रफलदः सुदृढश्छेदवर्जितः । अग्रन्थिरृजुरूपः स्यादानाभ्याकण्ठमध्यतः ।। यावदिच्छं भवेद्देवि ! सज्जिकागुण उत्तमः । तावदेव प्रकुर्वीत सज्जिकागुणमीश्वरि ।। ( पा. त. २।४९–५१ )

मूर्ध्नि वा कण्ठदेशे वा कक्षे वक्ष:स्थलेऽपि वा ।
कुक्षौ हस्ततले वापि धारयेल्लिङ्गमैश्वरम् ॥
नाभेरधस्ताल्लिङ्गस्य धारणं पापकारणम् ।
जटाग्रे त्रिकभागे च मलस्थाने न धारयेत् ॥
( सि. शि. ६।३०-३१, पृ. ९७ )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनानुसार मस्तक, कंठ, वक्षस्थल, बाहु आदि उपरिनिर्दिष्ट सहा भागांपैकीं कोणत्याहि एका स्थानावर इच्छेनुसार हें धारण केलें पाहिजे. नाभीच्या खालीं धारण करणें निषिद्ध आहे.

अशा प्रकारचें हें इष्टलिंगधारण वीरशैव धर्मात स्त्री आणि पुरुष दोघांनाहि समानरूपानें केलें जातें.

## इष्टलिंगपूजेत सूतकाचा प्रतिषेध

येथें एक शंका उपस्थित होते कीं, धर्मशास्त्रांत जनन, मरण, रज, उच्छिष्ट तथा जाती हीं पांच प्रकारचीं सूतकें मानलेलीं आहेत. अर्थात् घरीं कोणाचा जन्म अथवा मृत्यू झाल्यास, घरातील कुणी स्त्री रजस्वला झाल्यास सूतक होतें. या सूतक-कालांत त्या घरीं पूजा आदि वैदिक कर्में निषिद्ध मानलीं गेलीं आहेत. त्याप्रमाणें उच्छिष्ट-ग्रहण करणें, शिवाय कांहीं विशिष्ट जातीच्या लोकांबरोबर सम्पर्क न ठेवण्याचेंही विधान आहे. अशा परिस्थितींत, स्त्रियांना लिंगदीक्षा दिल्यानंतर रजस्वलाच्या सूतकाच्या वेळीं इष्टलिंगाची पूजा कशी करता येईल ?

या शंकेचा परिहार करण्यासाठीं वीरशैव आचार्यांनी इष्टलिंगपूजेत सूतक मानलेलें नाहीं.

लिङ्गार्चनरतायाश्च ऋतौ नार्या न सूतकम् ।
तथा प्रसूतिकायाश्च सूतकं नैव विद्यते ॥
गृहे यस्मिन् प्रसूता स्त्री सूतकं नात्र विद्यते ।
शिवपादाम्बुसंस्पर्शात् सर्वपापं प्रणश्यति ॥
( सि. शि. ९।४४-४५; पृ. १५०-१५१ )

तात्पर्य हें कीं, "यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात्" या प्रमाणवचनानुसार अग्निहोत्र हें नित्यकर्म मानून वैदिक धर्मांत नित्य त्याचें अनुष्ठान करतात. त्याचप्रमाणें वीरशैव धर्मांत इष्टलिंगाचें पूजन हें नित्यकर्म मानलें गेलें आहे. ज्याच्या अनुष्ठानानें पुण्याची प्राप्ती होत नाहीं व अनुष्ठान न करण्यानें दुरिताची प्राप्ति होते, त्याला नित्यकर्म म्हणतात. अशा प्रकारें नित्यकर्माचें अनुष्ठान न केल्यानें प्राप्त होणारें दुरित, त्याच्या अनुष्ठानानें प्राप्त होत नाहीं, हेंच नित्यकर्माचें फळ होय.[1]

लिङ्गस्य धारणं यस्य स्थूलदेहे न विद्यते ।
तद्देहं निष्फलं ज्ञेयं जीवत्यक्तशरीरवत् ॥
तस्मात्तद्धारणं प्रोक्तं यावज्जीवाग्निहोत्रवत् ।

( सिद्धान्तशिखोपनिषद्वीरशैवभाष्यम्, पृ. ४२ )

या प्रमाणवचनानें उमचिगि श्री शंकर शास्त्रीजींनी म्हटलें आहे कीं, इष्टलिंगविरहित वीरशैवाचे शरीर निर्जीव असतें. म्हणून तें धारण करून यावज्जीव अग्निहोत्राप्रमाणें त्याची पूजा करण्याच्या विधीस पुष्टी दिली आहे.

प्राणवद्धारणीयं तत्प्राणलिङ्गमिदं तव ।
कदाचित्कुत्रचिद्वापि न वियोजय देहतः ॥

( सि. शि. ६।५, पृ. ९० )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनावरूनही उक्त विधीला ( पूजा ) परिपुष्टी मिळते. इष्टलिंग धारण व त्याचें पूजारूपी नित्यकर्म वीरशैव धर्मांत स्त्रियांना देखील विहित आहे. अतः आचार्यांनी त्या कर्माच्या अनुष्ठानानें स्त्रियांना सूतक-प्राप्ती मानलेली नाहीं.

यथा विश्वेशनिकटात् गङ्गा सूतकवर्जिता ।
तथा लिङ्गाङ्किता भक्ताः पञ्चसूतकवर्जिताः ॥ ( लिङ्गसारे )

---

१. नित्यं सदा यावदायुर्न कदाचिदतिक्रमेत् ।
उपेत्यातिक्रमे दोषश्रुतेरत्यागदर्शनात् ॥
फलश्रुतेर्वीप्सया च तन्नित्यमिह कीर्तितम् ।

( न्यायकोश, पृ. ४१७-४१८ )

वर्षाऋतूत नद्यांना जेव्हां पूर येतो, त्यावेळीं नद्यांना रज:सूतकाची प्राप्ति समजून नदीस्नानाचा निषेध केल्यानंतरही, शिवसंयुक्त असल्यामुळें गंगेला रज:सूतक मानलेलें नाहीं, तद्वतच वीरशैव स्त्रियांनासुद्धां इष्टलिंगाचा संपर्क असल्याकारणानें रज:सूतक होत नाहीं; असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे. हेंच लिंगसाराच्या या वचनाचें तात्पर्य होय.

या प्रसंगीं हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, ज्याप्रमाणें पौण्डरीक आदि दीर्घकालीन सत्रांचा संकल्प करून याग (यज्ञ) करतेवेळीं यजमानाची पत्नी जर रजस्वला झाली, तरी ती स्नान करून ओलें वस्त्र परिधान करून यज्ञात सम्मिलित होते. त्याप्रमाणें वीरशैव धर्मांत दीक्षा घेतलेली स्त्री रजस्वला अथवा प्रसूत झाली तरीही त्याच दिवशीं स्नान करून गुरुच्या पादोदकाचें प्रोक्षण करून शुद्ध होऊन, आपलें नित्यकर्म, इष्टलिंगाची पूजा करण्याचा तिला अधिकार प्राप्त होतो. इष्टलिंग पूजेच्या अतिरिक्त स्वयंपाक आदि अन्य कार्यांसाठीं वीरशैव धर्मांतही सूतक मानलें जातें. ज्याप्रमाणें हातानें स्पर्श करण्यास जिव्हा अपवित्र झाल्यावरही मन्त्रोच्चारासाठीं सदैव पवित्र असते, त्याप्रमाणेंच रजस्वला अथवा प्रसूत स्त्री स्वयंपाक आदि अन्य लौकिक कर्म करण्यास अयोग्य आणि अपवित्र असूनही इष्टलिंगधारणेस आणि त्याची पूजा करण्यास ती अग्नि, रवि तथा वायूप्रमाणें सदा पवित्र असते.[1]

याशिवाय घरीं कोणाचा मृत्यु झाला, तर त्या घरातील लोकांनीही शव-संस्कारानंतर स्नान आणि गुरुपादोदकाच्या प्रोक्षणानें घर शुद्ध करून आपापल्या इष्टलिंगाची पूजा—हें नित्यकर्म—कोणतीहि बाधा न येतां अवश्य

---

१. स्वेष्टलिङ्गैकपूजायां नैवाशौचं विधीयते।
पौण्डरीके रज: स्त्रीणां स्वाग्निहोत्रे यथा तथा॥
अकरस्पर्शयोग्यापि यथा जिह्वा महेश्वरी।
मन्त्रोच्चारणमात्रस्य पूता भवति भूतले॥
तथा सूतकिन: शैवा: पूजामात्रसुनिर्मला:।
नान्यस्पर्शानुकूला: स्युरिति वेदानुशासनम्॥
(सिद्धान्तशिखोपनिषद्वीरशैवभाष्यम्, पृ. ४३-४४)

पूर्ण करू शकतात. अतः वीरशैवांना इष्टलिंग पूजेत मरणसूतकसुद्धां लागत नाहीं.

शैवं देवार्चनं यस्य यस्य चाग्निपरिग्रहः ।
ब्रह्मचारियतीनां च शरीरे नास्ति सूतकम् ।।
लिङ्गार्चनरता नारी सूतकी वा रजस्वला ।
रविरग्निर्यथा वायुस्तथा कोटिगुणोज्ज्वला ।।
जातके मृतके वापि न त्याज्यं शिवपूजनम् ।

( ब्र. सू., श्रीकर., १।१।१, पृ. १२ )

पराशर स्मृतीचें हें वचन उद्धृत करून भगवान् भाष्यकार श्रीपतिपण्डिताराध्य यांनीं श्रीकरभाष्याच्या जिज्ञासा अधिकरणांत स्त्रियांना इष्टलिंग पूजेसाठीं कोणतेही सूतक बाधक होत नाहीं, याचें समर्थन केलें आहे.

अशाप्रकारें अनेक प्रमाणांनीं इष्टलिंग पूजेंत सूतक प्राप्त होत नसल्यानें इष्टलिंग दीक्षेंत स्त्री व पुरुष या दोघांनाही समान अधिकार आहे हें सिद्ध होतें. अन्य धर्मापेक्षां या धर्मांत स्त्रियांनाही धार्मिक स्वातन्त्र्य देऊन वीरशैव आचार्यांनीं वीरशैव धर्माची प्रतिष्ठा वाढविली आहे.

## इष्टलिंगधारण वेदसम्मत आहे

वीरशैवांची ही इष्टलिंगधारणक्रिया केवळ आगमसम्मतच नाहीं, तर वेदसम्मतही आहे. "पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते" ( ऋग्वेद ९।८३।१ ), "या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी" ( वाजसनेयसंहिता, १६।२ ) ऋग्वेद तथा यजुर्वेदाच्या या मंत्रांत लिंगरूप परशिवास धारण करण्याचें विधान केलें गेलें आहे. श्री जगद्गुरु रेणुकाचार्यांनीं अगस्त्यमहर्षींना हे दोन्ही वेदमंत्र उद्धृत करतेसमयीं इष्टलिंगधारणेची वेदसम्मतता समजावून सांगितली आहे.[१]

---

१. ऋगित्याह पवित्रं ते विततं ब्रह्मणस्पते ।
तस्मात् पवित्रं तल्लिङ्गं धार्यं शैवमनामयम् ।।
अघोरा पापकाशीति या ते रुद्र शिवा तनूः ।
यजुषा गीयते यस्मात् तस्माच्छैवोऽघवर्जितः ।।

( सि. शि. ६।३७, ४०, पृ. ९८-९९ )

श्रीकरभाष्यकर्ते श्रीपतिपण्डिताराध्य यांनीं "लिङ्गधारणसिद्धान्तस्य तु प्रात्यक्षिकश्रुतिस्मृत्यागमपुराणेतिहासविहितत्वेन लिङ्गधारणस्याग्निहोत्रादिवद् वैदिकत्वं सिद्धम्" ( ब्र. सू., श्रीकर, १।१।१ ) याप्रकारें जिज्ञासा अधिकरणात अत्यन्त विस्ताराने अनेक वेदागमप्रमाणांनीं इष्टलिंगधारण वैदिक सिद्ध केलें आहे.

श्री मोग्गेय मायिदेव यांच्या वचनानुसार वीरशैवांचें हें इष्टलिंग एक प्रतीक अथवा मूर्ति नसून आत्मदर्शनाचें एक साधन आहे. ज्याप्रमाणें एखादी सुन्दर स्त्री आरशांत पाहात असतांना आपल्याच सुंदर स्वरूपाचा साक्षात्कार करते, तद्वतच प्रत्येक वीरशैव इष्टलिंगाच्या पुजेंत त्यांत दृष्टीयोग ( शिवयोग ) साधनेद्वारें आत्मसाक्षात्कार करतो. हें इष्टलिंग वीरशैवांना ओळखण्याचें एक बाह्यचिन्हही आहे.

या स्थूल शिवलिंगाव्यतिरिक्त वीरशैव धर्मात आन्तरिक साधनेसाठी प्राणलिंग आणि भावलिंगाची उपासनाही विहित आहे. अतः क्रमशः त्या दोहोंच्या स्वरूपाचें विवेचन करूं.

## प्राणलिङ्गस्वरूप

प्राणलिङ्गाचें स्वरूप वस्तुतः योगाभ्यासानें आकलन होतें. सर्वसाधारण लोकांना याची प्रतीति होत नाहीं. श्री ज. रेणुकाचार्यांनीं अगस्त्यमहर्षींना पुढीलप्रमाणें प्राणलिङ्गाचें स्वरूप समजावून सांगितलें आहे—

प्राणापानसमाघातात् कन्दमध्याद्यदुत्थितम् ।
प्राणलिङ्गं तदाख्यातं प्राणापाननिरोधिभिः ॥

( सि. शि. १२।६, पृ. २ )

तात्पर्य हें आहे कीं, मूलाधारांत असलेल्या अपानवायुबरोबर जेव्हां प्राणवायूचा संघर्ष होतो, तेव्हां एका दिव्य ज्योतीचा उदय होतो. मूलाधारांत उत्पन्न झालेली ती ज्योति सुषुम्नेच्या मार्गानें जाऊन कुंडलिनीला ऊर्ध्वमुख करीत हृदयाच्या अनाहत चक्राच्या ज्याला द्वादशदलांचे कमल म्हटलें जातें, त्याच्या मध्यभागीं असलेल्या कर्णिकेंत जाऊन थांबते. ही ज्योति अंगुष्ठ

परिमाणाची आणि विद्रुम वर्णाची ( अरुण वर्ण ) असते. याच ज्योतीला वीरशैव शिवयोग्यांनीं प्राणलिंग म्हटलें आहे.

प्राणो यत्र लयं याति भास्करे तुहिनं यथा ।
तत्प्राणलिङ्गमुद्दिष्टं तद्धारी स्यात्तदाकृतिः ॥ ( सि. शि. १२।७, पृ. ३ )

आचार्यांच्या ह्या वचनानुसार, प्राणलिंग ही संज्ञा यासाठीं दिली कीं, ज्याप्रमाणें सूर्योदय झाल्यानंतर तुहिण-कण ( दवबिन्दु ) त्याच्या प्रकाशांत विलीन होऊन जातात, तद्वतच हृदयांतील या दिव्य ज्योतीमध्यें प्राणवायू-चाहि विलय होतो. अतः प्राण-शक्तिविशिष्ट या ज्योतीला 'प्राण-लिंग' म्हणतात. देशकालसंबंधाशिवाय 'चिदहन्ता' अर्थात् स्वकीय चिद्रूपाचें ज्ञानच 'प्राणलिंग' होय.

"अत्रायं पुरुषः स्वयंज्योतिः" ( बृ. उ. ४।३।९ )

या श्रुतीतही आत्म्याची चिद्रूपता दाखविली आहे. आत्म्याची ती चिद्रूपता स्वप्नावस्थेंत सर्वांना अनुभवगम्य होते. ह्याचें रहस्य हें आहे कीं, कोणतीही वस्तु प्रकाशाशिवाय दिसू शकत नाहीं. जागृत अवस्थेंत दिवसा सूर्याच्या प्रकाशात व रात्रीं दिव्याच्या प्रकाशांत सर्व व्यवहार चालतो. स्वप्नावस्थेंत ह्या सूर्य आणि दिव्याचा प्रकाश निष्प्रयोजन होतो. म्हणूनच—"न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः" ( कठ उ. ५।१५ ) या श्रुतीनें स्वप्नावस्थेंत सर्वप्रकारच्या प्रकाशाचा अभाव दाखविला आहे. या बाह्य प्रकाशांचा अभाव असूनसुद्धां स्वप्नांतील सर्व पदार्थ स्पष्टपणें दिसतात. तरी त्या पदार्थांच्या प्रतीतीत कारणीभूत असलेला प्रकाशच आत्मप्रकाश होय. जागृतावस्थेंत सूर्य आदींच्या प्रकाशानें व्यवहार चालत असल्यामुळें आत्मप्रकाशाची प्रतीति होत नाहीं. परंतु स्वप्नावस्थेंत त्या सर्व प्रकाशांचा अभाव असल्याकारणानें आत्मप्रकाशाची प्रतीति होते. हें ध्यानांत ठेवून आपल्या प्रकाशस्वरूपाचें अनुसन्धान करणें हीच प्राणलिंगोपासना होय.

## प्राणलिङ्गार्चना

हे ज्योतिर्मय प्राणलिङ्ग भावनागम्य असल्यामुळें त्याची अर्चनासुद्धां भावनामय वस्तूंनीच केली जाते. ती याप्रकारें—प्राणलिंगाच्या अभिषेकासाठीं

क्षमा ( सहनशीलता ) हेंच जल. नित्य आणि अनित्य वस्तूंचा विवेक हेंच त्याला परिधान करण्याचें वस्त्र, सर्वदा सत्य बोलणें हेच त्या लिंगाचे अलंकार व आभूषणें, वैराग्य हीच त्याला घालण्याची पुष्पमाला. चित्त शान्त झाल्यावर समाधि लागणें हेंच गंधसमर्पण होय. निरहंकार भावना हीच अक्षत, दृढ श्रद्धा हाच धूप आणि आत्मज्ञान होणें हाच दीप होय. भ्रांतीची निवृत्ति होणें हेंच नैवेद्य दाखविणें होय. लौकिक व्यवहारात मौन होऊन जाणें हाच घण्टानाद होय. विषय समर्पण करणें हाच ताम्बूल होय. अर्थात् प्रमेय वस्तूंचे प्रमाणरूप ज्ञानांत, त्या प्रमाणरूप ज्ञानाचें प्रमातृरूप आत्म्यामध्यें आणि त्या आत्म्याचा ज्योतीरूप प्राणलिंगात लय होण्याचें चिंतन करणें हाच विषयसमर्पणरूप ताम्बूल होय. हें विश्व ( प्रपञ्च ) शिवापासून भिन्न आहे. मीसुद्धां शिवापासून भिन्न आहे, अशाप्रकारच्या भेदबुद्धीची निवृत्ति होणें हीच प्रदक्षिणा होय. अभेदचिंतन करणाऱ्या त्या बुद्धिवृत्तीचाही शेवटीं त्या ज्योतिर्लिङ्गात लय होणें हीच नमस्कारक्रिया होय. वीरशैव दर्शनामध्यें ह्या उपर्युक्त भावनांनीं प्राणलिंगाची अर्चना सांगितली आहे.

तात्पर्य हें आहे कीं, साधकाच्या बहिर्मुख बुद्धिवृत्तींचा निरोध होऊन त्याच्या अंतःकरणांत उपर्युक्त सद्गुण, सद्ज्ञान आणि सद्भावनांचा उदय होणें हीच प्राणलिंगाची अर्चना होय. म्हणून ह्या प्राणलिंगाच्या अर्चनेसाठीं कोणताही निश्चित समय नाहीं. जोंपर्यंत साधकाच्या मनांत ह्या भावना उठत असतात, तोपर्यंत ही प्राणलिंगाची अर्चना होत राहाते.[1]

१. बद्धेन्द्रियनवद्वारे बोधदीपे हृदालये । पद्मपीठे समासीनं चिल्लिङ्गं शिवविग्रहम् ।। भावयित्वा सदाकालं पूजयेद्भाववस्तुभिः । क्षमाऽभिषेकसलिलं विवेको वस्त्रमुच्यते ।। सत्यमाभरणं प्रोक्तं वैराग्यं पुष्पमालिका । गन्धः समाधिसम्पत्तिरक्षता निरहङ्कृतिः ।। श्रद्धा धूपो महाज्ञानं जगद्भासिप्रदीपिका । भ्रान्तिमूलप्रपञ्चस्य नैवेद्यं तन्निवेदनम् ।। मौनं घण्टापरिस्पन्दस्ताम्बूलं विषयार्पणम् । विषयभ्रान्तिराहित्यं तत् प्रदक्षिणकल्पना ।। बुद्धिस्तदात्मिकासक्तिर्नमस्कारक्रिया मता । एवंविधैर्भावशुद्धैरुपचारैरदूषितैः ।। प्रत्यङ्मुखमना भूत्वा पूजयेल्लिङ्गमान्तरम् ।।
( सि. शि. १२।३–८, पृ. ६-७ )

ह्या प्रकारच्या प्राणलिंगार्चनाच्या साधनेमुळें साधकाची मनोवृत्ति सदा अंतर्मुख होऊन भावलिंगाच्या अनुसंधानांत लागते.

यांतां क्रमप्राप्त भाव-लिंगस्वरूपाचें विवेचन करूंया —

## भावलिङ्गस्वरूप व त्याची अर्चना

क्रिया यथा लयं प्राप्ता तथा भावोऽपि लीयते ।
यत्र तद्देशिकैरुक्तं भावलिङ्गमिति स्फुटम् ॥

( सि. शि. १५।१, पृ ५९ )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनानुसार सर्व बाह्यक्रियांचा विलय झाल्यानंतर 'शिवोऽहं' ( मी शिवस्वरूप आहें ) अशा प्रकारच्या भावनेनें, अर्थात् तैलधारेप्रमाणें निरन्तर त्याच्याच चिन्तनरूप निदिध्यासाच्या बळावर साधकास आपल्या मस्तकांत असलेल्या सहस्रार कमलांत ज्या दिव्य ज्योतिस्वरूप परशिवाचा आत्मस्वरूपानें साक्षात्कार होतो, त्यालाच भावलिंग म्हणतात. हें निराकार आहे. अर्थात् याला त्रिकोण, षट्कोण आदि कोणताच आकार नाहीं. याला परिपूर्ण रूप म्हटलें जातें. बाह्य प्रमाणांनी अगोचर होऊनही निर्मल व शान्तबुद्धिद्वारें ह्याचा साक्षात्कार होतो.

'शिवोऽहं' ह्या शुद्धबुद्धिवृत्तीनें याचा साक्षात्कार होतो. आणि त्याची अर्चनाही ह्याच वृत्तीनें होते. अर्थात् भावलिंगाच्या अर्चनेसाठीं 'शिवोऽहं' भावनेशिवाय कोणत्याही सामग्रीची आवश्यकता नाहीं; म्हणून त्याला भावलिंग म्हटलें जातें.

भावेन गृह्यते देवो भगवान् परमः शिवः ।
किं तेन क्रियते तस्य नित्यपूर्णो हि स स्मृतः ॥
अखण्डपरमानन्दबोधरूपः परः शिवः ।
भक्तानामुपचारेण भावयोगात् प्रसीदति ॥

( सि. शि. १५।२-३, पृ. ५९ )

उपासकाची ही भावनासुद्धां अंतीं त्याच ज्योतीत विलीन होऊन जाते. अशाप्रकारचा भावनामय व्यापाराचाच विषय असल्यानें 'भावलिङ्ग' म्हणविलें जातें. ह्यालाच तृप्तिलिङ्गही म्हणतात.

ज्या साधकाची मनोवृत्ति अन्तर्मुखी होऊन जाते, तो इष्टलिंगाची पूजा उपचारांनी करीत असला तरी प्राणलिंग तथा भावलिंगाच्याच अनुसंधानामध्यें अधिक रुची घेतो. अन्ततः भावलिंगाचें अनुसंधान करणें हेंच वीरशैवांचे परम लक्ष्य होय.

अशाप्रकारें इष्टलिंगात दृष्टीयोगाच्या ( त्राटक ) साधनेनें नेत्रांचा, प्राणलिंगानुसंधानानें मनाचा, आणि भाव-लिंगार्चनानें बुद्धीचा दोष निवृत्त होऊन वीरशैवांचा त्रिविध करण परिशुद्ध होतो. इष्ट, प्राण तथा भावलिंग साधकाच्या त्रिकरणशुद्धिद्वारें सांसारिक विषयांपासून त्याची रक्षा करतें, म्हणून अष्टावरणांत लिंगाला दुसरें आवरण मानलें गेलें आहे. त्यांतही इष्टलिंग स्थूल शरीराचा, प्राणलिंग सूक्ष्मशरीराचा व भावलिंग कारण-शरीराचा रक्षक मानला जातो.

# ३. जंगम

वीरशैव अष्टावरणांत तिसरें स्थान जंगम. "एकमूर्तिस्त्रयो भागा गुरुर्लिङ्गं तु जङ्गमः" या उक्तीच्या आधारावर एकाच परशिव चैतन्याचीं हीं तीन रूपें मानलेलीं आहेत.[१] गुरु आणि लिंगाचें विवेचन केल्यानंतर आतां 'जंगम' आवरणाचा क्रम आहे. शास्त्रानुसार त्याचें विवेचन करीत आहोंत.

जंगम शब्दाच्या दार्शनिक व साम्प्रदायिक भेदामुळें दोन परिभाषा आहेत. त्यांत —

जानन्त्यतिशयाद्ये तु शिवं विश्वप्रकाशकम् ।
स्वस्वरूपतया ते तु जङ्गमा इति कीर्तिताः ॥
( सि. शि. ११।२, पृ. २०४ )

या आचार्योक्तीत दार्शनिक परिभाषा वर्णिली आहे. त्याचा अर्थ असा आहे—"तस्य भासा सर्वमिदं विभाति" ( मुण्ड उ. २।२।१० ) या श्रुतीच्या प्रमाणावरून ज्याच्या प्रकाशानें सूर्य, चन्द्रासहित अखिल विश्व ( प्रपञ्च ) प्रकाशित होत आहे, आणि जो आपल्या आत्म्यापासून भिन्न आहे, त्या स्वयंज्योतीस्वरूप परशिवास, अर्थात् शिवाबरोबर ज्याला अभेदबोध उत्पन्न झाला आहे, त्या आत्मज्ञान्यास वीरशैवदर्शनात जंगम म्हटलें आहे. अशाप्रकारें जीवन्मुक्त महापुरुषच येथें जंगम म्हणविला जातो.

जकाराज्जननं दूरं गकाराद् गतिनाशनम् ।
मकारान्मरणं नष्टं जङ्गमस्त्र्यक्षरात्मकः ॥
यस्य नास्ति पुनर्जन्म गतिर्नास्ति कदाचन ।
बाधते यं न मरणं शृणु नाथे स जङ्गमः ॥
जरामरणशून्यत्वाद् गमागमविवर्जनात् ।
मनुष्याचाररहित्याज्जङ्गमोऽयमुदाहृतः ॥
( वी. स. स. १५।६–८ )

---

१. एक एव शिवः साक्षात् सर्वानुग्रहकारकः ।
गुरुजङ्गमलिङ्गात्मा वर्तते भुक्तिमुक्तिदः ॥ ( सि. शि. ९।२, पृ. १५५ )

या प्रमाणवचनांत जंगम शब्दाच्या अक्षरार्थानेसुद्धां तोच अर्थ सूचित केला जातो. तो याप्रमाणें—'ज' चा अर्थ जननरहित, 'ग' चा अर्थ गमनरहित आणि 'म' चा अर्थ मरणरहित असा आहे. याप्रकारें जनन-मरणरूप गमनागमनरहित जीवन्मुक्त महापुरुषच जंगम होय. हा निःस्पृह आणि निरहंकारभावानें लोककल्याणार्थं आपलें अवशिष्ट जीवन व्यतीत करतो. याला 'शिवयोगी' या नांवानेंही ओळखलें जातें.

जंगम शब्दाची साम्प्रदायिक परिभाषा पुढीलप्रमाणें आहे—ज्याप्रमाणें ब्राह्मण शब्द "ब्रह्म जानातीति ब्राह्मणः" या व्युत्पत्तीनुसार दार्शनिक दृष्टीनें ब्रह्मज्ञान्यांचा प्रतिपादक असूनही वर्ण-व्यवहारांत एक जातीवाचक आहे; त्याप्रमाणेंच जंगम शब्द दार्शनिक दृष्टीनें शिवज्ञानसम्पन्न जीवन्मुक्ताचा प्रतिपादक असूनसुद्धां साम्प्रदायिक दृष्टीनें जातीचाही वाचक आहे. अर्थात् 'वीर-माहेश्वर' वंशात (ज्याला लिंगी ब्राह्मण म्हटलें जातें) जन्मलेल्या लोकांनाही जंगम म्हणतात. म्हणून वीर-माहेश्वर आणि जंगम हे दोन्ही शब्द पर्यायवाचक आहेत.[1]

वीरशैव समाजांत जंगमवंशोत्पन्न व्यक्तीचीही मोठी प्रतिष्ठा आहे. प्रत्येक सण व विशिष्ट धार्मिक कार्यांत त्यांना निमंत्रण देऊन त्यांची पादपूजा करून त्यांचे चरणामृत घेऊनच पुढील कार्य संपन्न करतात. ही प्रथा अत्यन्त प्राचीन कालापासून चालत आलेली आहे.

ही प्रथा पाहिल्यानंतर असें वाटतें कीं ह्या जंगमवंशांत पूर्वी अनेक जीवन्मुक्त महापुरुष होऊन गेले असावेत. अतः त्यांची महानता दृष्टीपुढें ठेवून त्यांच्या संतानांची पूजा करण्याची प्रथा चालत आली असावी. जंगम वंशात आजसुद्धां कोठें कोठें जीवन्मुक्त लोक दृष्टीस पडतात. सर्वच जंगमलोकांत पराकाष्ठेच्या ज्ञानाचा अभाव असूनसुद्धां त्यांचे आचारविचार आणि

१. अतो विशिष्टवीरेति वीरमाहेश्वरेति च ।
पर्यायो वर्तते देवि जङ्गमस्य महात्मनः ।।

(वी. स. स. ११।४५)

व्यवहारामुळें वीरशैवजन त्यांना पूज्य मानतात. प्रत्येक नियमाला अपवाद असतातच. म्हणून एखाद्या व्यक्तीमुळें संपूर्ण समाजास दोषी ठरविणें उचित नव्हे.

जंगमेतर कोणी वीरशैव आपल्या साधनेच्या बळावर पूर्वोक्त जीवन्मुक्त अवस्था प्राप्त करतो. त्याचीहि पूजा अर्चा करतात. केली पाहिजे.

गुरु, लिङ्ग आणि जंगम ह्या तिन्हीं आराध्यांत ज्ञानोपदेशानें सामान्य जनतेला मोक्षमार्गांत प्रवृत्त करण्याच्या कारणामुळें जंगमाचें स्थान उच्च मानलें जातें.

पूर्वोक्त शिवज्ञानसम्पन्न जीवन्मुक्त जंगमाच्या स्वय, चर आणि पर अशा तीन अवस्था असतात. त्या अवस्था प्राप्त केलेल्या जंगमास स्वय-जंगम, चर-जंगम आणि पर-जंगम म्हणतात. या तिघांच्या स्वरूपाचें क्रमशः वर्णन पुढीलप्रमाणें —

## स्वय-जंगम

यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ।।

( ई. उ. ६ )

या श्रुतीनुसार सर्वत्र 'स्वयं' लाच पाहण्यावरून हा स्वय-जंगम संबोधला जातो. श्री ज. रेणुकाचार्यांनीं अगस्त्यऋषींना याचें लक्षण पुढीलप्रमाणें सांगितलें आहे.

स्वच्छन्दाचारसन्तुष्टो ज्योतिर्लिङ्गपरायणः ।
आत्मस्थसकलाकारः स्वाभिधो मुनिसत्तमः ।।

( सि. शि. १५।२, पृ. ६४ )

तात्पर्य—अहंकार-ममकाररहित हा स्वय-जंगम स्वतंत्र स्वभावाचा असतो. अर्थात् तो कोणाच्या आधीन नसतो. हा इष्टलिंग पूजेबरोबरच मूलाधार, हृदय आणि भ्रूमध्यांत प्रकाशमान ज्योतिर्लिङ्गाची उपासना करीत असतो.

ध्यानं शैवं तथा ज्ञानं भिक्षा चैकान्तशीलता ।
यतेश्चत्वारि कर्माणि न पञ्चममिहेष्यते ॥

( सि. शि. १५।६, पृ. ६५ )

आचार्यांच्या या उक्तीनुसार हा कोणत्याही गावात अथवा नगराच्या मठांत एकान्तवासात असतो. सदा शिवध्यानांत मग्न असतो. सद्भक्तांच्या घरून भिक्षा मागून त्याद्वारेंच अतिथींचा सत्कार करून स्वतः भिक्षा-ग्रहण करतो; आणि त्या गावांतील भक्तांना शिवज्ञानाचा उपदेश करून लोकांना सन्मार्गावर वाटचाल करण्याचें शिक्षण देतो. हींच स्वय-जंगमाचीं चार कामें असतात.[1] हेच स्वय-जंगमाचें स्वरूप व त्याचा व्यवहार होय.

याला स्वय-जंगम म्हणण्याचें तात्पर्य हें कीं हा सर्वत्र 'स्वयं' पाहतो. अर्थात् सर्व प्राणिमात्रांत आपल्याच स्वरूपाचा साक्षात्कार करतो. तो कुणाची घृणा करीत नाहीं अथवा कुणाचा द्वेष करीत नाहीं. राजा, रंक, मूर्ख, विद्वान् या सर्वांमध्यें त्याची समत्वदृष्टी असते.

## चर-जंगम

स्वरूपज्ञानसम्पन्नो ध्वस्ताहंममताकृतिः ।
स्वयमेव स्वयं भूत्वा चरतीति चराभिधः ॥

( सि. शि. १५।१, पृ. ६६ )

आचार्यांच्या या उक्तीनुसार स्वस्वरूपाचें ज्ञान आणि आनंदाच्या उन्मादात संचरण करणाऱ्या जीवन्मुक्त जंगमास 'चर-जंगम' म्हणतात. हा शिवाद्वैत ज्ञानानें समस्त विश्वास ( प्रपञ्चास ) शिवस्वरूपांत पाहून, मान आणि अपमान यांत समताभावयुक्त होऊन प्राकृतिक सम्पत्तीत निःस्पृह; शम, दम आदि सद्गुणांनी समन्वित होऊन सदैव सन्तुष्टहृदयी संचरणशील असतो.

हा आपल्या संचारामध्यें दर्शन-स्पर्शन तथा शिवज्ञानाच्या उपदेशानें भक्तांचा उद्धार करीत राहतो. चर-जंगमात लोकसंग्रहाची वासना अद्याप वास

---

१. आणखी पहा—वे. वी. चि. उत्तरखण्ड, १२।२०१—२०५.

करते. लोकोद्धार करणें हेंच याच्या संचाराचें प्रयोजन. अशाप्रकारच्या संचरणशील जंगमास 'चर-पट्टाधिकारी' ही म्हणतात.[1]

येथें हें माहित असावें कीं, प्राचीन काळीं वीरशैवांच्या गुरुवर्गाच्या मठांत दोन व्यक्तींचा पट्टाभिषेक केला जात असे. त्यापैकीं एक पट्टाधिकारी असायचा व दुसरा चराधिकारी. पट्टाधिकारी मठांतच निवास करून, मठांत येणाऱ्या भक्तांना धार्मिक संस्कार देऊन धर्मोपदेश करीत असत; आणि चराधिकारी भक्तांच्या घराघरापर्यंत जाऊन वीरशैव तत्त्वांचा बोध करीत असत.

ही प्रथा केवळ सामान्य शाखामठामध्येंच नव्हती, तर वीरशैवांचीं जीं मुख्य पांच पीठें (रंभापुरी, उज्जयिनी, श्रीशैल, काशी आणि केदार) आहेत, त्यांच्यामध्येंही ही पद्धत प्राचीन कालापासून चालत आलेली होती. परंतु हल्लीं सोयीच्या दृष्टीनें एकाच व्यक्तीस चर-पट्टाधिकार देण्याची प्रथा सर्वत्र प्रचलित झाली आहे. अत: वीरशैव मठाधीश वर्षातील कांही महिने भक्तोद्धारासाठीं भ्रमणही करतात; आणि कांही महिने मठात राहून त्याची देखभालही करतात. म्हणून प्राचीन ग्रंथांत चर-पट्टाधिकारी यांस 'चर-जंगम' संबोधिलें आहे.

## पर-जंगम

"परश्चासौ जङ्गमश्च परजङ्गम:" ही या शब्दाची व्युत्पत्ति. 'पर'चा अर्थ श्रेष्ठ आणि 'जंगमा'चा अर्थ जीवन्मुक्त. अर्थात् जीवन्मुक्तांत जो श्रेष्ठ मानला जातो, त्याला 'पर-जंगम' असें संबोधिलें जातें. जीवन्मुक्तीची हीच पराकाष्ठा होय. हिला 'तूर्यावस्था' किंवा 'परमहंस' अवस्था असेंही म्हणूं शकतों. या जीवन्मुक्तासाठीं कोणताही विधि-निषेध नाहीं. हा कोणत्याही एका ठिकाणीं वास करू शकतो. अथवा संचार करीतही राहू शकतो.

स्वयमेव स्वयं भूत्वा चरत: स्वस्वरूपत: ।
परं नास्तीति बोधस्य परत्वमभिधीयते ॥

(सि. शि. १५।१, पृ. ६८)

---

१. पहा—वी. स. स. १५।२२–३१, पृ. १३१.

या आचार्योक्तीनुसार, पर म्हणजे विश्वोत्तीर्ण पर-शिव, या पर-शिवास स्वात्मरूपानें जाणणाऱ्या या जीवन्मुक्ताची मनोवृत्तीही तैलधारेप्रमाणें निरन्तर त्याच शिवस्वरूपांत लीन असते. म्हणून पर-जंगमास पर, अर्थात् आपल्याहून भिन्न दुसऱ्या व्यक्तीचा अथवा पदार्थाचा बोध होत नाहीं. तर सर्वत्र आपल्याच स्वरूपाचा बोध होतो. म्हणूनही ह्याला पर-जंगम म्हटलें जातें.

व्यावहारिक भेदाचाही बोध न राहिल्यामुळें यांच्याकडून लोकांना तत्त्वोपदेश होणें असंभव आहे. या पुरुषाच्या दर्शन व स्पर्शानेही प्राण्यांचा उद्धार होतो. यांची लोकसंग्रहाची वासना संपूर्ण निवृत्त असते. हा देहधारी असूनही निर्देही म्हणविला जातो. तात्पर्य हें कीं, याचें शारीरिक भोजन आदि व्यवहार स्वत:कडून न होतां दुसऱ्याकडून करविले जातात.

ह्याच्या पादस्पर्शानें सामान्य नद्याही तीर्थ बनतात आणि ह्याचें निवासस्थान दिव्यक्षेत्र बनतें.

जंगम शब्दाच्या विस्तृत विश्लेषणानें ज्ञात होतें कीं, सामान्यत: स्वत: चालणारे सर्व जीवजन्तु, माहेश्वर वंशांत जन्मलेले लोक तथा शिवज्ञानसम्पन्न जीवन्मुक्त महापुरुष, हे सर्व जंगम शब्दानें व्यवहृत होतात. परंतु वीरशैवांच्या अष्टावरणांत जंगम स्थान कोणास दिलें जातें? ही शंका उत्पन्न झाली असतां बाराव्या शतकातील वीरशैव महान् सन्त महात्मा बसवेश्वर म्हणतात–

"जंगम-निन्दा करीत लिंगाची उपासना
करणाऱ्या भक्ताचें साहस कसें ?
शिव-शिव ! निन्दा करीत उपासना करण्याचें
पातक ऐकविलें जाऊ शकत नाहीं.
गुरुचे गुरु असतात जंगम, असें आहे कूडलसंगमदेवाचें वचन।"
(बसवेश्वरांची वचनें, ४२४)

आपल्या ह्या वाणीत, गुरुचा जो गुरु असतो, ज्याला परमगुरु म्हणतात, त्याला जंगम म्हटलें आहे. लोकांत ज्याप्रमाणें पितामह हा पिता आणि पुत्र या दोघांपेक्षां श्रेष्ठ असतो, तद्वतच जंगम, लिंग आणि गुरुपेक्षांही श्रेष्ठ

असतो. म्हणून घरीं जंगम येतांच गुरु आणि लिंगाची पूजा सोडून जंगमाची पादपूजा करण्याचें विधान वीरशैव धर्मात सांगितलें आहे.

"लिङ्गमुखं वै जङ्गमः" ह्या उक्तीनुसार लिंगाचें मुखच जंगम होय. जी वस्तु अथवा पदार्थ लिंगार्पित करणें आहे, ती वस्तु वा पदार्थ वीरशैव लोक जंगमास अर्पण करतात. जंगमाच्या तृप्तीनें लिंगाची तृप्ती होते. ज्याप्रमाणें कोणताहि पदार्थ मुखांत टाकल्यानें पोटाची तृप्ति होते, तद्वतच जंगमाला खाऊ घातल्यानें लिंगाचीही तृप्ति होऊन जाते. कारण जंगम लिंगाचें मुख मानला जातो.

श्री बसवेश्वर म्हणतात—

मूळच वृक्षाचें मुख मानून पाणी शिपल्यास
अंकूर वर येतील.
जंगमासच लिङ्गाचें मुख समजून प्रत्येक पदार्थ अर्पण केल्यानें
भविष्यांत सकल सम्पत्ति देतील
त्या हर रूपी जंगमास नर मानल्यास
नरकापासून मुक्तता नाहीं, कूडलसंगमदेवा. (ब. व. ४२०)

श्री बसवेश्वर पुढें म्हणतात--

लिङ्गात सत्य शोधायचें असेल तर जंगमावर विश्वास ठेवा.
त्यांना चालतें लिङ्ग, बोलतें लिङ्ग, मुखलिङ्ग समजा.
"यत्र माहेश्वरस्तत्र सन्निहितः शिवः" असल्यानें
अधरास मिळे स्वाद, उदरास मिळे सुख.
जंगमद्वारें उपभोग करतात कूडलसंगमदेव.
(ब. व. ४२७)

महात्मा बसवेश्वरांच्या वाणीचें पृथःकरण केल्यास लिंगापेक्षा जंगमाचें महत्त्व अधिक मानले जाते. जंगम शिवाचेंच साकार रूप होय. अतः वीरागमांत म्हटलें आहे—

सर्वलोकोपकाराय यो देवः परमेश्वरः ।
चरत्यतिथिरूपेण नमस्ते जङ्गमात्मने ॥

वीरशैव धर्मांत जंगम दासोहाचें मोठें महत्त्व आहे. म्हणून श्री बसवेश्वर आदि जितके संत होऊन गेले, ते सर्व जंगम-दासोही होते. श्री बसवेश्वर आपल्या राज्यांत दररोज एक लाख शहाण्णव हजार जंगमांना भोजन-वस्त्र आणि दक्षिणा देऊन तृप्त करीत असत. शिवस्वरूप जंगमांना तृप्त करणें हें सामान्य कार्य नव्हे. श्री बसवेश्वर त्यांच्यापूर्वीच्या जंगमदासोही संतांचे उदाहरण देऊन म्हणतात—

"पुरातनांचा पथ सुगम पथ नाहीं
त्यांनीं बल्लाळाच्या वधूशीं हास-परिहास केला
सिरियाळसुताच्या प्राणांची मागणी केली
त्यांनीं दासय्याकडून वस्त्र घेतलें
कूडलसंगमदेवाचे शरण असाधारण आहेत,
अद्भुत आहेत. त्यांचा पथ सुगम पथ नाहीं"

( ब. व. १४७ )

बसवेश्वरांच्या या वचनांत अत्यंत कठिण अशा जंगमदासोहांत उत्तीर्ण झालेल्या तीन संतांच्या कथा आहेत. यांतील प्रथम आहे सिन्धु बल्लाळाचें जंगमाला वधुदान.

तमिळनाडूत तिरुवण्णामलै नांवाचे एक पवित्र शिवक्षेत्र आहे. प्राचीन काळीं सिन्धु बल्लाळ नांवाचा राजा तेथें राज्य करीत होता. तो जंगमभक्तीत अत्यंत प्रख्यात होता. जंगमानें येऊन कशाचीही मागणी केली, तरी तो निःसंकोच देत असे. एक वेळ साक्षात् शिव त्याची परीक्षा घेण्यासाठीं कामातं जंगमाच्या रूपांत त्याच्या राजवाड्यांत गेले. राजानें त्याची पादपूजा करून स्वादिष्ट भोजनाने त्याला तृप्त केलें. जंगमानें रात्रीं तेथेंच वास्तव्य केलें. तो म्हणाला, 'स्त्रीशिवाय मला झोप येणार नाहीं.' राजानें अंतःपुरांतील सर्व सुंदर स्त्रियांना आणून जंगमापुढें उभे केलें. त्यांच्यापैकीं एकीलाही त्यानें पसंत केले नाहीं. अखेर राजाला पट्टराणीस पाठवून देण्यास सांगितलें. पतीच्या आज्ञेनुसार राणी आली. पण लगेच तिला झोप लागली. अरुणोदय होतांच जंगम लहान मूल बनून स्तनपान करू लागल्याचें दृश्य सिन्धु बल्लाळानें

पाहिलें. तो संतुष्ट झाला. तेव्हां शिव प्रकट झाले; आणि त्या दम्पतीस कैलासास घेऊन गेले.

दुसरें उदाहरण श्रियाळाचें आहे. कांचीपुरात श्रियाळ नांवाचा शेट्टी रहात असे. चांगुणा त्याची पत्नी. ते दम्पती शिवभक्त होतें. त्यांना चिल्लाळ नांवाचा पुत्र होता. ते तिघेही जंगमभक्त होते. एकदां श्री शिव त्यांची परीक्षा घेण्यासाठीं जंगम बनून त्यांच्या घरीं गेले. "माझें नरमांस भक्षण करण्याचें व्रत आहे. तुमच्या मुलाचें मांस शिजवून मला जेवायला द्या" असें ते म्हणाले. त्यांनीं चिल्लाळाचे तुकडे करून तें मांस शिजवून जंगमास वाढलें. शिवांनी संतुष्ट होऊन पुत्रास जीवंत केलें, आणि श्रियाळ-चांगुणा यांना कैलासास नेलें.

तिसरा प्रसंग देवर-दासिमय्य याच्या वस्त्रदानाचा आहे. गुलबर्गा जिल्ह्यातील मुदनूर गावात देवर-दासिमय्य कापड विणण्याचा कायक (उद्योग) करीत असे. आपल्या उद्योगानें प्राप्त झालेल्या धनांतून जंगम दासोह (ज्ञानी साधु-संतांचा आदरसत्कार) करण्यांत त्याची ख्याती होती. एकदां बारा वर्षें शिवध्यान करीत त्यानें एक अद्भुत वस्त्र विणलें. सिद्धापूरच्या बाजारांत तें वस्त्र विकण्यासाठीं घेऊन गेला. कोणताही व्यापारी त्याची किंमत करू शकला नाहीं. तें वस्त्र तसेंच परत घेऊन येत असतां मार्गात एका जंगमानें त्या वस्त्राची मागणी केली. जंगमप्रेमी दासिमय्यानें ते देऊन टाकलें. तो जंगम म्हणजे साक्षात् शिव होते. त्यांनी दासिमय्यास मूठभर धान्य दिलें. दासिमय्यानें तें आपली पत्नी दुग्गलास नेऊन दिलें. तिनें तें शेतांत पेरलें. तोच अक्षय निधि झाला.[१]

श्री बसवेश्वरांनी आपल्या वरील वचनांत तीन जंगम-भक्तांचीं उदाहरणें देऊन सांगितलें कीं, अशी भक्ति करणें अत्यन्त कठिण आहे. वीरशैवांच्या

१. शिवयोगिनि यद्दत्तं तदक्षयफलं भवेत् ।
तस्मात् सर्वप्रयत्नेन तस्मै देयं महात्मने ।।
(सि. शि. ९।६; पृ. १५६)

संत-साहित्यांत ( शरण-साहित्यांत ) जंगमभक्तीच्या हजारों कथा आहेत. विस्तारभयास्तव येथें संक्षेपानें सांगितलें आहे.

शिवयोगिनि सन्तृप्ते तृप्तो भवति शङ्करः।
तत्तृप्त्या तन्मयं विश्वं तृप्तिमेति चराचरम् ॥

( सि. शि. ९।१३, पृ. १६५ )

या आचार्योक्तीनुसार शिवयोगी अर्थात् जंगमाच्या तृप्तीनें शिव संतुष्ट होतात. शिवाच्या सन्तोषानें, त्यांच्यात राहणारा चराचर प्रपञ्च ( विश्व ) सन्तुष्ट होतो. हा सिद्धान्त मानून वीरशैव समाजांत जंगमास आपल्या शक्तीनुसार भक्ति समर्पित केली जाते.

गुरुचे गुरु ( परमगुरु ), जीवन्मुक्त महापुरुष जंगमास, आपल्या ज्ञानोपदेशानें भवसागरापासून भक्तांचें रक्षण करण्याच्या कारणानें, वीरशैव धर्मात अष्टावरणांत तिसरें आवरण मानलें आहे.

वीरशैव अष्टावरणक्रमात चौथा आणि पांचवा क्रमांक पादोदक आणि प्रसादाचा आहे. परन्तु ते 'पूजेची फळें' मानले गेले आहेत. म्हणून फळांचें वर्णन शेवटीं करणें उचित समजून प्रथम पूजेची साधनभूत विभूति, रुद्राक्ष आणि मन्त्राचें क्रमशः विश्लेषण करीत आहोंत.

—

# ४. विभूति ( भस्म )

यो लिङ्गधारी नियतान्तरात्मा नित्यं शिवाराधनबद्धचित्तः ।
स धारयेत् सर्वमलापहत्यै भस्मामलं चारु यथाप्रयोगम् ।।

( सि. शि. ६।४१, पृ. १०० )

श्री ज. रेणुकाचार्यांच्या या आदेशानुसार लिंगधारी सर्व वीरशैव आपले दोष दूर करण्यासाठीं पवित्र भस्म धारण करतात.

"धिग् भस्मरहितं भालं धिग् ग्राममशिवालयम्"

या शास्त्रोक्तीच्या अनुसार शिवालयरहित ग्राम अणि भस्मरहित भाल ( कपाळ ) अमंगल मानले जातात. महात्मा बसवेश्वर म्हणतात—

कमळ सरोवराची शोभा
तरंग सागराची शोभा
गुण नारीची शोभा
चन्द्रमा आकाशाची शोभा
कूडलसंगम देवाच्या शरणांच्या
ललाटाची विभूतीच शोभा ।।

( ब. व. ७४ )

आपल्या ह्या वचनांत अनेक उपमा देऊन, शिवभक्ताच्या ललाटाची शोभा भस्मानेंच होते असें समजावून सांगितलें आहे.

वीरशैव सिद्धान्तात भस्म-धारण-विधि निरुपाधि आणि सोपाधिच्या भेदामुळें दोन प्रकारचे मानले जातात.

महाभस्मेति संचिन्त्य महादेवं प्रभामयम् ।
वर्तन्ते ये महाभागा मुख्यास्ते भस्मधारिणः ।।

( सि. शि. ७।२; पृ. १०१ )

सिद्धान्तशिखामणीच्या या श्लोकांत निरुपाधिक भस्म-धारण-विधि सांगितला आहे. याचें तात्पर्य हें कीं, "स एष भस्मज्योतिस्स एष भस्मज्योतिः" हें भस्म जाबाल श्रुतीच्या आदेशानुसार ज्योतिर्लिंगस्वरूप परशिवात व्यक्तीची मनोवृत्ति लीन होऊन जेव्हां चेतनस्वरूप होते, त्यालाच चिद्भस्मधारण अथवा निरुपाधिक भस्मधारण म्हणतात. "भासनात् प्रकाशनात् भसितम्" या व्युत्पत्तीनुसार चिद्रुपानें प्रकाशमान झाल्यानें परशिवास भस्म म्हणणें उचित आहे. ह्या परमात्मचिन्तनरूप चिद्भस्मास धारण केल्यानें मनाच्या संकल्प-विकल्पात्मक विपरीत भावना नष्ट होऊन जातात; आणि साधक सदैव शिवानन्दात विलीन राहतो.

हें आन्तरिक भस्म उच्चकोटीचे साधकच धारण करू शकतात. सामान्य जनतेसाठीं सोपाधिक भस्मधारणच सुलभ आहे.

शिवाग्न्यादिसमुत्पन्नं मन्त्रन्यासादियोगतः ।
तदुपाधिकमित्याहुर्भस्मतन्त्रविशारदाः ॥

( सि. शि. ७।३, पृ. १०१ )

आचार्यांच्या ह्या उक्तीनुसार गोमय मन्त्रसंस्कारानें परिशुद्ध करून तयार केलेल्या भस्माला सोपाधिक भस्म म्हटलें जातें. सोपाधिक भस्म कल्प, अनुकल्प, उपकल्प आणि अकल्प या नांवाच्या चतुर्विध प्रक्रियांनी तयार करण्याचा विधि शास्त्रांत सांगितला आहे.[१]

घरीं गायीचें गोमय भूमीवर पडण्याआधींच सद्योजात मन्त्रोच्चारण-पूर्वक तें घेऊन वामदेव मन्त्रानें गोळा करून, तत्पुरुष मन्त्रानें ते वाळविले पाहिजे. वाळल्यानंतर स्थण्डिलावर अग्नि तयार करून अघोर मन्त्रानें जाळून, ईशान मन्त्रानें त्याचा संचय करून एका बिल्वपात्रांत ठेवून पूजेच्या वेळीं त्याचा उपयोग केला पाहिजे. हीच 'कल्प' प्रक्रिया होय. आणि हाच विधि सर्वश्रेष्ठ आहे.

अरण्यांत प्राप्त झालेल्या शुष्क गोमयास अघोर मन्त्रानें जाळून तयार करण्याच्या विधीस 'अनुकल्प' प्रक्रिया म्हणतात. दुकानांत मिळणारें भस्म

१. पहा—सि. शि. ७।१३, पृ. १०४.

वस्त्रानें गाळून त्यांत गोमूत्राचें मिश्रण करून वाळविलें पाहिजे. पुन्हां अघोर मन्त्रानें जाळून तयार करण्याचा विधीच 'उपकल्प' प्रक्रिया होय. या तिन्ही प्रक्रियाविरहित यथाकथंचित् तयार करण्याच्या विधीस 'अकल्प' प्रक्रिया म्हणतात.[१]

हे भस्म पांच प्रकारच्या गायीच्या गोमयापासून तयार केलें जातें म्हणून त्यास विभूति, भसित, भस्म, क्षार आणि रक्षा अशीं पांच संबोधनें आहेत.[२]

## (क) विभूति

शिवाच्या सद्योजात मुखापासून उत्पन्न झाली, असें मानण्यात येत असलेल्या कपिल वर्णाच्या नन्दा नावाच्या गायीच्या गोमयापासून तयार केलेल्या भस्मास 'विभूति' म्हणतातः नित्यकर्मे करतेवेळीं ही विभूति धारण केली जाते. "विभूतिर्भूतिहेतुत्वात्" ह्या आचार्यांच्या उक्तीनुसार ही भूति, अर्थात् अणिमा आदि आठ ऐश्वर्ये देणारी असल्यामुळें तिला विभूति म्हणतात.

## (ख) भसित

शिवाच्या वामदेव मुखापासून उत्पन्न झाली आहे, असें मानण्यात येणाऱ्या कृष्णवर्णी 'भद्रा' नावाच्या गायीच्या गोमयापासून तयार केलेल्या भस्मास 'भसित' म्हणतात. नैमित्तिक कर्मे करतांना हें धारण केलें जातें.

---

१. यथाशास्त्रोक्तविधिना गृहीत्वा गोमयं नवम् ॥
सद्येन वामदेवेन कुर्यात् पिण्डमनुत्तमम् ।
शोषयेत् पुरुषेणैव दहेद् घोराच्छिवाग्निना ॥
कल्पं तद्भस्म विज्ञेयमनुकल्पमथोच्यते ।
वनेषु गोमयं यच्च शुष्कं चूर्णीकृतं तथा ॥
दग्धं चैवानुकल्पाख्यमापणादिगतं तु यत् ।
वस्त्रेणोत्तारितं भस्म गोमूत्राबद्धपिण्डकम् ॥
दग्धं प्रागुक्तविधिना भवेद् भस्मोपकल्पकम् ।
अन्यैरापादितं भस्माप्यकल्पमिति निश्चितम् ॥
(सि. शि. ७।१४–१८, पृ. १०५)

—२. पहा. सि. शि. ७।४, पृ. १०२.

"भसितं तत्त्वभासनात्" या उक्तीनुसार भसित धारण करणारांस पर-शिव-तत्त्वाचा भास अर्थात् प्रकाशन होऊ लागतें. म्हणून याला भसित म्हणतात.

## ( ग ) भस्म

शिवाच्या अघोर मुखापासून उत्पन्न झाली आहे, असें मानलें गेलेल्या शुभ्र वर्णाच्या 'सुरभि' गायीच्या गोमयापासून तयार केलेल्या विभूतीस 'भस्म' म्हणतात. सर्व प्रकारच्या प्रायश्चित्त कर्मांत भस्माचा उपयोग केला जातो. "पापानां भर्त्सनाद् भस्म" ह्या आचार्यांच्या उक्तीनुसार ज्याला मन-वाणी व काया यापासून उपन्न झालेल्या पापांचें भय उत्पन्न होतें, त्याचीं सर्व पापें भस्म धारण केल्यानें पळून जातात. म्हणून त्याला भस्म म्हणतात.

## ( घ ) क्षार

शिवाच्या तत्पुरुष मुखापासून जन्म झाला आहे, असें मानण्यांत येणाऱ्या धूम्र ( धूर ) वर्णाच्या सुशीला नांवाच्या गायीच्या गोमयापासून तयार करण्यांत आलेल्या भस्मास 'क्षार' म्हणतात. सर्व प्रकारची काम्यकर्में करतांना क्षाराचा उपयोग केला जातो. "क्षारणात् क्षारमापदाम्" ह्या उक्तीनुसार हें धारण केल्यानें सर्वप्रकारच्या आपत्तींचा क्षय होतो. अर्थात् सर्वप्रकारच्या आपत्ति दूर होतात. म्हणून त्याला 'क्षार' म्हणतात.

## ( ङ ) रक्षा

शिवाच्या ईशान मुखापासून उत्पन्न झाली, असें मानले गेलेल्या लाल रंगाच्या 'सुमना' नामक गायीच्या गोमयापासून तयार करण्यांत आलेल्या भस्मास 'रक्षा' म्हणतात. मोक्षाच्या हेतूनें निष्काम कर्में करतांना हिचा उपयोग केला जातो. "रक्षणात् सर्वभूतेभ्यो रक्षेति परिगीयते" आचार्यांच्या ह्या उक्तीनुसार हें धारण करणाऱ्यांचे भूत, प्रेत इत्यादिपासून रक्षण होतें. म्हणून हिला 'रक्षा' म्हणतात.[1]

---

१. 'क' पासून 'ङ' पर्यंत वर्णिलेल्या पांच प्रकारच्या भस्मांच्या विस्तृत विवरणासाठीं पहा—सि. शि. ७।५–१०; पृ. १०२–१०४; बृ. जा. उ. १ ब्राह्मण; शै. र. ७।७३—७७.

उपर्युक्त पांच प्रकारच्या भस्मांपैकीं यथावसर एक भस्म घेऊन गुरु अथवा जंगमाच्या पादोदकानें ( चरणामृत ) परिशुद्ध केलेलें 'क्रियाभस्म' शास्त्रोक्त विधीनें धारण केलें पाहिजे.

वीरशैव सिद्धान्तात भस्म-धारण विधि—भस्मस्नान, भस्मोद्धूलन तथा त्रिपुण्ड्र-धारण या भेदामुळें तीन प्रकारचे मानले गेले आहेत.

मनुष्याच्या पापांचा नाश करणाऱ्या गंगा आदि नद्यांच्या स्नानापेक्षांहि सकलदोषनिवारक हें भस्मस्नानच सर्वश्रेष्ठ आहे. श्री ज. रेणुकाचार्य अगस्त्यांना उपदेश करतात—

भस्मना विहितं स्नानमिदमाग्नेयमुत्तमम् ।
स्नानेषु वारुणाद्येषु मुख्यमेतन्मलापहम् ॥
( सि. शि. ७।२३, पृ. १०७ )

भस्मस्नान करण्यापूर्वी जलस्नान केलें पाहिजे. रुग्ण असेल तर हात, मुख आणि पाय शुद्ध पाण्यानें धुऊन डाव्या तळहातावर भस्म ठेवून उजव्या हाताचें त्याला आच्छादन करून पंचाक्षरी मंत्रानें आठ वेळां अभिमन्त्रित करून ईशान मन्त्रानें शिर, तत्पुरुष मन्त्रानें मुख, अघोर मन्त्रानें हृदय, वामदेव मन्त्रानें नाभि, सद्योजात मन्त्रानें पाय आणि प्रणव मन्त्रानें सर्वांगास भस्मलेपन करणें म्हणजेच भस्मस्नान होय.[1]

प्राचीन काळीं ब्रह्मा आदि देवगण, नारद आदि मुनिगण, सनक आदि योगीगण तथा बाणासुर आदि दानवगण ह्या भस्मस्नानानें परिशुद्ध होऊन शिवभक्ति करून मुक्त झाले.[2]

भस्मस्नानानन्तर भस्मोद्धूलन केलें पाहिजे—

नमः शिवायेति भस्म कृत्वा सप्ताभिमन्त्रितम् ।
उद्धूलयेत् तेन देहं त्रिपुण्ड्रं चापि धारयेत् ॥
( सि. शि. ७।२९, पृ. १०९ )

---

१. पहा—सि. शि. ७।१९–२६, पृ. १०६–१०८.
२. पहा—सि. शि. ७।२७-२८, पृ. १०८.

आचार्यांच्या ह्या उक्तीत भस्मोद्धूलन-विधि सांगितलेला आहे. तात्पर्य, भस्मस्नानानंतर पुनः त्या भस्मास, सप्तजन्मांत केलेल्या दोषांच्या निवारणाचा संकल्प करून "नमः शिवाय" ह्या पंचाक्षरी मन्त्रानें सात वेळां अभिमन्त्रित करून, आपल्या बोटांनी सर्वांगात भस्माचें प्रोक्षण करणेंच भस्मोद्धूलन म्हणविलें जातें. "उत्कृष्टं धूलनं=उद्धूलनम्" ह्या विग्रहानुसार समूळ पापांचा विनाश करणें ( उडवून लावणें ), असा या शब्दाचा अर्थ होतो. उद्धूलनविधीनें साधकाच्या सर्व दोषांचें निवारण होतें.

भस्मस्नान व भस्मोद्धूलनानंतर त्रिपुण्ड्र धारण केलें पाहिजे. हा भस्म-धारणविधि सर्वांत श्रेष्ठ आहे. कदाचित् भस्मस्नान, भस्मोद्धूलन केलें नाहीं तरी त्रिपुण्ड्र धारण अवश्य केलें पाहिजे.[1]

त्रिपुण्ड्रं धारयेन्नित्यं भस्मना सलिलेन च ।
स्थानेषु पञ्चदशसु शरीरे साधकोत्तमः ॥

( सि. शि. ७।३१, पृ. १०९ )

ह्या आचार्योक्तीप्रमाणें वीरशैव सिद्धान्तास अनुसरून इष्टलिंगाच्या पूजेच्या वेळीं "अग्निरिति भस्म, वायुरिति भस्म, जलमिति भस्म, स्थलमिति भस्म, व्योमेति भस्म" ( का. रुद्रोपनिषद् ) ह्या मन्त्रानें डाव्या हातांत असलेल्या उजव्या हातानें झांकलेल्या भस्माला अभिमन्त्रित करून, "त्रियायुषं जमदग्नेः कश्यपस्य त्रियायुषं, अगस्त्यस्य त्रियायुषं, यद् देवानां त्रियायुषं, तन्मे अस्तु त्रियायुषम्" ह्या मन्त्रांचा उच्चारण करीत आपल्या शरीराच्या—मस्तक, ललाट, दोन्हीं कान, कण्ठ, दोन्हीं खांदे, दोन्हीं भुजा, दोन्हीं बाहू, मनगट, वक्ष, नाभि आणि पाठ—ह्या पन्धरा ( १५ ) जागीं जलमिश्रित भस्माचे त्रिपुण्ड्र धारण केलें पाहिजे.[2]

---

१. सर्वाङ्गोद्धूलनं चापि न समानं त्रिपुण्ड्रकैः ।
तस्मात् त्रिपुण्ड्रमेवैकं लिखेदुद्धूलनं विना ॥

( सि. शि. ७।३०, पृ. १०९ )

२. पहा—सि. शि. ७।३२-३३, पृ. १०९.

बृहज्जाबालोपनिषदांत[१] बत्तीस स्थानांत त्रिपुण्ड्र धारण करण्याचा विधि सांगितला आहे. तेवढें होत नसेल तर कमीत कमी पंधरा स्थानीं तरी त्रिपुण्ड्र धारण करणें अनिवार्य आहे.

तात्पर्य हे कीं, ज्या ज्या ठिकाणीं त्रिपुण्ड्र धारण केलें जातें, त्या त्या स्थानांपासून ( अंग ) होणारीं सर्व पापें नष्ट होतात. अतः त्रिपुण्ड्र शरीरावर अधिकाधिक स्थानांवर धारण करणें लाभदायक आहे. जाबालोपनिषदांत सांगितलें आहे कीं—

पापं नाशयते कृत्स्नमपि जन्मान्तरार्जितम् ॥
कण्ठोपरि कृतं पापं नष्टं स्यात्तत्र धारणात् ।
कर्णे तु धारणात् कर्णरोगादिकृतपातकम् ॥
बाहोर्बाहुकृतं पापं वक्षःसु मनसा कृतम् ।
नाभ्यां शिश्नकृतं पापं पृष्ठे गुदकृतं तथा ॥
पार्श्वयोर्धारणात्पापं परस्त्र्यालिङ्गनादिकम् ।
तद्भस्मधारणं कुर्यात् सर्वत्रैव त्रिपुण्ड्रकम् ॥

( बृ. जाबालोपनिषद्, ४ ब्राह्मण, ३२–३५ )

भस्मधारण करण्याचें महत्त्व महात्मा बसवेश्वर पुढील वचनांत सांगतात—

पूर्वजन्माचें पाप कसें मिटेल ह्याची चिंता करूं नका
कडू इंद्रावनामध्यें भस्म भरलें
तर तें तीन दिवसांत गोड होणार नाहीं ?
स्वामी, लाटकाच्या हातांत असलेला सुरा
परीस स्पर्शानें सुवर्ण होणार नाहीं काय ?
ललाटावर विभूती लावली तर पाप मिटणार नाहीं !
हे, कूडलसंगमदेवा ! ( ब. व. ७२ )

---

१. मस्तक, ललाट, दोन्हीं कान, दोन्हीं नेत्र, दोन्हीं नाकपुड्या, मुख, कण्ठ, दोन्हीं खांदे, दोन्हीं कोपरे, दोन्हीं मनगट, वक्ष, दोन्हीं ( बाजूच्या ) बरगड्या, नाभि, गुदा, लिंग, दोन्हीं मांड्या, दोन्हीं नितम्बभाग, दोन्हीं गुडघे, दोन्हीं पोटऱ्या, दोन्हीं पाउलें. पहा—बृ. जा. उ. ४ ब्राह्मण, १२–१४. पहा—चन्द्र. ज्ञा. क्रियापाद, ६।४५-४६.

अशाप्रकारें वेद, आगम, उपनिषद् तथा आधुनिक सन्तवाणींत सांगितलेले भस्मधारणाचें महत्त्व उत्तम प्रकारें समजून दैहिक तथा मानसिक स्वास्थ्य लाभण्यासाठीं—

मध्याङ्गुलित्रयेणैव स्वदक्षिणकरस्थ तु :
षडङ्गुलायतं मानमपि वाऽलिकमानकम् ॥
नेत्रयुग्मप्रमाणेन फाले दध्यात् त्रिपुण्ड्रकम् ।
मध्यमानामिकाङ्गुष्ठैरनुलोमविलोमतः ॥
( सि. शि. ७।३६-३७, पृ. ११०-१११ )

ह्या आचार्यांच्या उक्तीनुसार आपल्या उजव्या हाताच्या तीन बोटांनीं ( तर्जनी, मध्यमा व अनामिका ) अथवा मध्यमा, अनामिका तथा अंगुष्ठ अनुलोम-प्रतिलोम प्रक्रियेनें दोन्हीं कानांच्यामध्यें ललाटावर सरळ, स्निग्ध व अविच्छिन्न त्रिपुण्ड्र प्रातःकाळीं, माध्यान्हीं, आणि सायंकाळीं अत्यन्त श्रद्धेनें धारण केलें पाहिजे.[१]

त्रिपुण्ड्राच्या तीन रेषांपैकीं पहिली रेषा गार्हपत्य अग्नि, अकार, रजोगुण, भूलोक, देहात्मा, क्रियाशक्ति, ऋग्वेद, प्रातःकालीन सवन ( हवन ) आणि महेश्वर देवतेचें स्वरूप होय. दुसरी रेषा दक्षिणाग्नि, उकार, सत्त्वगुण, अन्तरिक्ष, अन्तरात्मा, इच्छाशक्ति, यजुर्वेद, मध्यान्ह सवन आणि सदाशिव देवतेचें स्वरूप होय. आणि तिसरी रेषा आहवनीय अग्नि, मकार, तमोगुण, स्वर्गलोक, परमात्मा, ज्ञानशक्ति, सामवेद, सायान्ह सवन आणि महादेव देवतेचें स्वरूप होय.

अशाप्रकारें जो कोणी उपर्युक्त विधीनें भस्माचें त्रिपुण्ड्र धारण करतो, तो महान अथवा लहान पातकें नष्ट करून पवित्र होतो. त्याला सर्व तीर्थांत स्नान करण्याचें फल प्राप्त होतें. श्री कालाग्निरुद्राने श्री सनत्कुमारास उपदेश करून अशाप्रकारेंच भस्म माहात्म्य सांगितलें आहे.[२]

---

१. प्रातःकाले च मध्याह्ने सायाह्ने च त्रिपुण्ड्रकम् ।
कदाचिद् भस्मना कुर्यात् स रुद्रो नात्र संशयः ॥
( सि. शि. ७।३९; पृ. १११ )

२. पहा—कालाग्निरुद्रोपनिषद्.

वैज्ञानिक दृष्टीनें विचार केला तरी गोमूत्र आणि गोमय यांमध्यें नैसर्गिक रोगनाशक शक्ति असते. भारतीय तथा पाश्चात्य वैज्ञानिक यांनीं संशोधन करून हा निष्कर्ष काढला आहे. आजकाल सर्व समाजांच्या सुशिक्षित परिवारांत मुखावर 'स्नो', 'पावडर' लावण्याची प्रथा आहे. वास्तविक पाहतां स्नो अथवा पॉवडरमध्यें सुगंधाशिवाय दुसरा कोणताही गुण नाहीं. आतां भारतीय तथा पाश्चात्य डॉक्टर या निष्कर्षाप्रत पोहोंचले आहेत कीं, दीर्घकाळपर्यंत स्नो, पॉवडरचा उपयोग केल्यानें चर्मांचा ( कातडीचा ) कॅन्सर होण्याची भीती आहे. दूषित स्नो-पॉवडर लावण्यापेक्षां गोमयापासून निर्माण केलेलें भस्म लावल्यानें धनाची बचत होते आणि उत्तम स्वास्थ्य लाभतें. सुगन्धाची अपेक्षा असल्यास भस्मात सुगन्धी द्रव्यें मिळवूं शकतात.

आयुर्वेदशास्त्रात अनेक रोगांची चिकित्सा गोमूत्र तथा गोमयानें करण्याचे विधि सांगितले आहेत. हिन्दु संस्कृतीत दीक्षा आदि धार्मिक संस्कार करतेवेळीं पंचगव्य ( गोमय, गोमूत्र, गोक्षीर, गोदधि आणि गोघृत ) प्राशन करतात. हिन्दु समाजांत गाय अत्यंत पूजनीय प्राणी आहे. हिन्दु शास्त्रानुसार गायीच्या शरीरात तेहतीस कोटी देवतांचा निवास आहे.

शिवाच्या पवित्र आभूषणांत भस्माला प्रमुख स्थान आहे. अतः गोमयापासून निर्माण केलेले पवित्र भस्म त्रिपुण्ड्ररूपांत शरीरावर धारण करण्यास संकोच करू नये. शिवाचें हें प्रिय आभूषण ज्या भक्ताच्या शरीरावर असेल, त्या भक्तावर शिवाची कृपा अवश्य होते.

एक प्रसिद्ध कथा अशी—

एकदां दुर्जय नांवाचा महापापी ब्रह्मराक्षस क्रौंचवनांत जाऊन पोहोंचला. तेथें एक शिवभक्त योगी तप करीत होते. त्या योग्यास गिळंकृत करण्यासाठीं राक्षसानें धाव घेतली. योगी ध्यानमग्न होते. हृदयांत भगवान् शिवाचें मंगलमय ध्यान करीत होते. ते निश्चल बसून राहिले. विक्राळमुखी राक्षसानें योग्यास पकडलें. परंतु आश्चर्य, योग्याच्या अंगाचा स्पर्श होतांच राक्षस निष्पाप झाला. त्याची बुद्धी परम निर्मळ झाली. खऱ्या महात्म्यांशी भाषण, त्यांचें दर्शन-स्पर्शन यांचे असेंच शुभ फल मिळतें. राक्षसानें विनयानें योगी

महाराजांना आपल्या पूर्वजन्मांची आणि पापांची माहिती सांगून अकस्मात् त्याची बुद्धी निर्मल कशी झाली, ह्याचें कारण विचारलें.

योगीराज म्हणाले, हे बन्धू, हें भगवान् शिवाच्या विभूतीचें फळ होय. शिव आमचें परम आराध्य दैवत आहेत. त्यांच्या भस्माच्या केवळ स्पर्शानें तुम्हांला दिव्य बुद्धि प्राप्त झाली आहे. याच भस्माच्या प्रतापानें आतां तुम्हीं शिवधामाचे अधिकारी झालांत. हा भस्मधारण करण्याचा महिमा होय !

भस्म धारण केल्यानें शिवाची कृपा झाल्याच्या अनेक कथा प्रसिद्ध आहेत. ग्रन्थविस्ताराच्या भयानें एकच कथा सांगितली आहे.

अशाप्रकारें भस्म धारण करणाऱ्यांच्या मानसिक पवित्रतेचें रक्षण करणाऱ्या या भस्मास वीरशैव सिद्धान्ताच्या अष्टावरणांत चतुर्थ आवरणाच्या रूपांत मान्यता देण्यांत आलेली आहे. पांचवे आवरण रुद्राक्ष ! त्याचें विवेचन करूंया.

—

# ५. रुद्राक्ष

भस्मना विहितस्नानस्त्रिपुण्ड्राङ्कितमस्तकः ।
शिवार्चनपरो नित्यं रुद्राक्षमपि धारयेत् ।।

( सि. शि. ७।१; पृ. ११३ )

या आचार्यांच्या आदेशानुसार भस्मधारणानंतर रुद्राक्ष-धारण हा प्रसंग येतो. वीरशैव अष्टावरणांत 'रुद्राक्ष' पाचवें आवरण होय. एका विशिष्ट वृक्षाच्या बियांना रुद्राक्ष म्हणतात. "रुद्रनेत्रसमुत्पन्ना रुद्राक्षा लोकपावना:" आचार्यांच्या ह्या उक्तीत रुद्राक्षाची उत्पत्ति सांगितली आहे.

रुद्राक्षाच्या उत्पत्तीच्या संबंधात एक प्रसिद्ध कथा आहे. तारकाक्ष, कमलाक्ष तथा वीर-विद्युन्माली नांवाच्या तीन असुरांनी आपल्या तपश्चर्येनें प्रसन्न केलेल्या ब्रह्मदेवाकडून मिळालेल्या वरात तीन अभेद्य नगरें प्राप्त करून घेतलीं होतीं. आपण अविनाशी आहोंत, ह्या अहंकारानें त्यांनीं देवतांवर अत्याचार सुरू केले. त्यांच्या पीडेनें संत्रस्त झालेल्या देवतांनीं स्वतःचें रक्षण व त्रिपुरासुराचा नाश या उद्देशानें शिवाची प्रार्थना केली. त्यांच्या प्रार्थनेनुसार शिव त्रिपुरासुरसंहारासाठीं तिन्ही पुरें एकत्र होईपर्यंत निर्निमेष दृष्टी लावून बसले. तेव्हां त्यांच्या नेत्रांतून जलबिंदू भूमीवर पडून वृक्ष उत्पन्न झाले. त्या वृक्षांची बीजें म्हणजेच रुद्राक्ष.[1]

---

१. ( क ) पुरा त्रिपुरसंहारे त्रिनेत्रो जगतां पतिः ।
उदपश्यत् पुरां योगमुन्मीलितविलोचनः ।।
निपेतुस्तस्य नेत्रेभ्यो वहवो जलबिन्दवः ।
तेभ्यो जाता हि रुद्रक्षा रुद्राक्षा इति कीर्तिताः ।।

( सि. शि. ७।३-४, पृ० ११३ )

( ख ) "सदाशिवः संहारकाले संहारं कृत्वा संहाराक्षं मुकुलीकरोति । तन्नयनाज्जाता रुद्राक्षा इति" ( बृ. जा. उ. ७, ब्राह्मण ८ )

हे रुद्राक्ष उत्पत्तीच्या भेदानें अडतीस ( ३८ ) प्रकारचे असतात. भगवान रुद्राच्या सूर्यनेत्रापासून कपिल वर्णाचे बारा; चंद्रनेत्रापासून शुभ्र वर्णाचे सोळा आणि अग्निनेत्रापासून कृष्ण वर्णाचे दहा प्रकारचे रुद्राक्ष उत्पन्न झाले.[१]

हे रुद्राक्ष एका मुखापासून चौदा मुखापर्यंतचे असतात. यांत एक मुखाचा रुद्राक्ष दुर्मिळ असतो. अन्य सर्व मुखांचे रुद्राक्ष उपलब्ध होतात. कांही लोक पंचमुखी रुद्राक्षाचीं चार मुखें कापून बनावट एकमुखी रुद्राक्ष करून विकतात. अतः चांगली परीक्षा असल्याशिवाय रुद्राक्ष खरेदी करूं नये.

अच्छिद्रं कनकप्रख्यमनन्यघृतमुत्तमम् ।
रुद्राक्षं धारयेत् प्राज्ञः शिवपूजापरायणः ॥

( सि. शि. ७।८, पृ. ११५ )

ह्या आचार्योक्तीनुसार रुद्राक्ष धारण करतांना किडयांनीं न खाल्लेले; अन्य कोणी न धारण केलेले, नूतन उत्तम रुद्राक्ष धारण केले पाहिजेत.

वीरशैवांसाठीं आपल्या इष्टलिंगाची पूजा करतांना शिखास्थानीं एकमुखी एक रुद्राक्ष, शिरावर द्विमुखी, त्रिमुखी व बारा मुखांचा प्रत्येकी एक एक असे तीन रुद्राक्ष, शिराच्या चहूंकडे अकरा मुखांचे छत्तीस रुद्राक्ष, दोन्हीं कानांत पाच मुखें, सात मुखें आणि दहा मुखांचे दोन दोन—असे सहा सहा रुद्राक्ष, कण्ठांत सहा मुखांचे सोळा आणि आठ मुखांचे सोळा असे बत्तीस रुद्राक्ष, वक्षस्थळावर चार मुखांचे पन्नास रुद्राक्ष, दोन्हीं बाहूंवर तेरा मुखाचे सोळा सोळा रुद्राक्ष, दोन्हीं मणिबन्धात ( मनगटात ) नव मुखांचे बारा बारा रुद्राक्ष आणि सोळा मुखांचे एकशे आठ रुद्राक्ष यज्ञोपविताच्या रूपांत धारण करण्याचें विधान आहे.[२]

---

१. पहा—सि. शि. ७।६-१७, पृ. ११४.

२. शिखायामेकमेकास्यं रुद्राक्षं धारयेद् बुधः ।
द्वित्रिद्वादशवक्त्राणि शिरसि त्रीणि धारयेत् ॥
षट्त्रिंशद्धारयेन्मूर्ध्नि नित्यमेकादशाननान् ।
दशसप्तपञ्चवक्त्रान् षट् षट् कर्णद्वये वहेत् ॥

हे सर्व रुद्राक्ष धारण करण्याचें फळ चन्द्रज्ञानागमात पुढीलप्रमाणें सांगितलें आहे—

एकमुखी रुद्राक्ष परतत्त्वाचें स्वरूप होय. तो धारण केल्यानें साधक जितेन्द्रिय होऊन अंतीं परतत्त्वात विलीन होतो. दोन मुखाचा रुद्राक्ष अर्धनारीश्वराचें स्वरूप होय. तो धारण केल्यानें अर्धनारीश्वराची कृपा प्राप्त होते. तीन मुखांचा रुद्राक्ष गार्हपत्य, दक्षिण तथा आहवनीय नामक अग्नित्रयाचें स्वरूप होय. तो धारण केल्यानें अग्निदेवाची कृपा होते तथा स्त्रीहत्त्येचें पापही भस्म होऊन जातें. चार मुखांचा रुद्राक्ष ब्रह्माचें स्वरूप होय. तो धारण केल्यानें ब्रह्माची कृपा होते. पाच मुखाचा रुद्राक्ष पंचब्रह्म सदाशिवाचें स्वरूप आहे. तो धारण केल्यानें सदाशिव सन्तुष्ट होतात. सहा मुखाच्या रुद्राक्षाच्या कार्तिकेय तथा विनायक अधिदेवता आहेत. तो धारण केल्यानें सर्व विघ्नें दूर होऊन जातात. शिवाय परमैश्वर्याची प्राप्ती होते.

सात मुखाच्या रुद्राक्षाच्या सप्तमातृका अधिदेवता आहेत. तो धारण केल्यानें त्या सन्तुष्ट होऊन प्रत्येक कार्यांत विजय प्रदान करतात. आठ मुखाच्या रुद्राक्षाचे अष्ट दिक्पाल व अष्ट वसु अधिदेव आहेत. तो धारण केल्यानें वांछित फल प्राप्त होतें. नव मुखांच्या रुद्राक्षाच्या दुर्गा आदि नव शक्ति अधिदेवता आहेत. तो धारण केल्यानें त्या शक्ति सन्तुष्ट होतात. दशमुखी रुद्राक्षाची देवता यमराज आहेत. तो धारण केल्यानें यमाची कृपा प्राप्त होते अर्थात् अपमृत्यु होत नाहीं.

---

षडष्टवदनान् कण्ठे द्वात्रिंशद्धारयेत् सदा ।
पञ्चाशद्धारयेद्विद्वान् चतुर्वक्त्राणि वक्षसि ॥
त्रयोदशमुखान् बाह्वोर्धरेत् षोडश षोडश ।
प्रत्येकं द्वादश वहेन्नवास्यान्मणिबन्धयोः ॥
चतुर्दशमुखं यज्ञसूत्रमष्टोत्तरं शतम् ।
धारयेत् सार्वकालं तु रुद्राक्षं शिवपूजकः ॥

( सि. शि. ७।१०–१४, पृ. ११५-११६ )

अकरा मुखाच्या रुद्राक्षाच्या अकरा रुद्र तथा इन्द्र अधिदेवता असतात. तो धारण केल्यानें सौभाग्याची वृद्धी होते. बारा मुखाचा रुद्राक्ष श्री विष्णूचें स्वरूप होय. द्वादश सूर्य त्याच्या अधिदेवता आहेत. तो धारण केल्यानें ह्या देवता सन्तुष्ट होतात. तेरा मुखी रुद्राक्ष कामदेवाचें स्वरूप आहे. तो धारण केल्यानें कामदेव सन्तुष्ट होतात. चौदा मुखांचा रुद्राक्ष रुद्राच्या नेत्रापासून उत्पन्न झाला आहे. तो धारण केल्यास सर्व प्रकारचे रोग नष्ट होऊन आरोग्याची प्राप्ती होते.[1]

ह्या रुद्राक्षांव्यतिरिक्त एक असाहि रुद्राक्ष असतो कीं, जो दोन रुद्राक्षांचें संयुक्त स्वरूप असतो. त्याला 'गौरीशंकर' म्हणतात. त्याचेंही फार महत्त्व आहे. हा वीरशैव सिद्धान्ताच्या शिव आणि शक्तीच्या अविनाभाव संबंधाचें द्योतक आहे. ह्रा शरीरावर धारण केल्यानें शिवपार्वती त्याच्या शरीरात सदैव वास करतात. त्यांतही अनेक मुखांचे दाणे असतात. त्यांतील अकरा अथवा त्यांहूनही अधिक मुखांचे रुद्राक्ष क्रमशः उत्कृष्ट मानले जातात.

आजकाल वैज्ञानिक दृष्टीनें हें सिद्ध झालें आहे कीं, रुद्राक्ष धारण केल्यानें रक्तदाब, हृदयविकार आदि भयानक रोग होत नाहींत. याचा हा गुणधर्म लक्षांत घेऊनच अधिकाधिक लोक रुद्राक्ष वापरू लागले आहेत. त्यामुळें अलिकडे रुद्राक्ष महाग झाले आहेत. असमर्थ व्यक्तीनें कमीत कमी एक रुद्राक्ष धारण केला पाहिजे.

चन्द्रज्ञान आगमात सांगितलें आहे कीं—

यस्याङ्गे नास्ति रुद्राक्ष एकोऽपि बहुपुण्यदः ।
तस्य जन्म निरर्थं स्यात् त्रिपुण्ड्ररहितं यथा ।।

( च. आ., क्रियापाद, ७।४६ )

तात्पर्य, ज्याप्रमाणें त्रिपुण्ड्ररहित शरीर निरर्थक असतें तद्वतच रुद्राक्षरहित मनुष्याचा जन्म निरर्थक असतो.

स्नान करतेवेळीं मस्तकावर रुद्राक्ष ठेवून जो प्राणी स्नान करतो, त्याला

१. पहा—चन्द्रज्ञानागम, क्रियापाद, ७।२५–३८.

गंगास्नानाचें फळ मिळतें.[१] रुद्राक्ष धारणाचा महिमा श्री ज. रेणुकाचार्यांनीं अगस्त्यास असा सांगितला आहे—

गवां कोटिप्रदानस्य यत्फलं भुवि लभ्यते ।
तत्फलं लभते मर्त्यो नित्यं रुद्राक्षधारणात् ।।
मृत्युकाले च रुद्राक्षं निष्पीड्य सह वारिणा ।
यः पिबेच्चिन्तयन् रुद्रं रुद्रलोकं स गच्छति ।।

( सि. शि., ७।१९-२०, पृ. ११८ )

याचा अर्थ असा—एक कोटी गोदान केल्यानें जें फळ मिळतें, तें नित्य रुद्राक्ष धारण केल्यानें मिळतें. इतकेंच नव्हे तर अन्तकाळीं रुद्राक्षप्रक्षालित पाणी रुद्राचें स्मरण करीत प्याल्यानें रुद्रलोकाची प्राप्ती होते.

रुद्राक्षप्रक्षालित पाणी प्याल्यानें अकालीं येणारा मृत्यू दूर जातो. यासंबंधीं एक कथा प्रसिद्ध आहे—

काश्मीर देशाच्या भद्रसेन राजाचा पुत्र सुधर्मा आणि त्याच्या मन्त्र्याचा पुत्र तारक दोघेही महान शिवभक्त व पितृभक्त होते. दोघेही नित्य सर्वांगावर विभूती धारण करीत असत. गळ्यात रुद्राक्षांची माळ घालून सदा शिवपुजेंत तल्लीन असत. एकदां महामुनी पराशर राजाच्या घरीं आले. त्यांनी राजाला सांगितलें कीं आजपासून सातव्या दिवशीं सुधर्मास मृत्यू येणार आहे. हें ऐकून राजाला मोठें दुःख झालें. राजानें विचारणा केल्यावरून पराशरांनीं सांगितलें कीं, "जर दहा हजार रुद्रावर्तनांनी शंकरावर अभिषेकाच्या धारा सोडल्या तर तुझ्या पुत्राचा अपमृत्यु टळू शकेल." श्री शिवाच्या कृपेनें कांहींच असंभव नाहीं. मुनींच्या वचनानें राजाला थोडें आश्वासन मिळालें. राजानें हजारों ऋत्विजांना आमंत्रण देऊन त्यांच्याद्वारें रुद्राभिषेक सुरू केला. सातव्या दिवशीं दुपारीं सुधर्मा मृत्यु पावला. पराशर मुनींनी रुद्राभिषेकाचें तीर्थ

---

१. मूर्ध्नि विन्यस्य रुद्राक्षं यः स्नाति मतिमान्नरः ।
गङ्गास्नानफलं तस्य जायते नात्र संशयः ।।
( च. आ., क्रियापाद, ७।४७ )

सुधर्मांच्या मृत शरीरावर शिंपलें आणि पवित्र मन्त्रीकृत रुद्राक्षाच्याद्वारें थोडें तीर्थ त्याच्या मुखांत घातलें. शंकराच्या कृपेनें राजकुमाराचे प्राण परत आले. राजकुमार सुधर्माला विचारतां त्यानें सांगितलें कीं, "मला यमराज घेऊन जात होते. इतक्यात अकस्मात एका तेजोमय श्वेतकाय जटाधारी मूर्तीने प्रकट होऊन यमराजास ताडण केलें आणि मला त्याच्यापासून सोडविलें. मला सोडून यमराज त्यांची स्तुति करू लागले." राजाच्या परिवारात आनंदीआनंद झाला. सर्व लोक शिवभक्तीस लागले. राजपुत्र सुधर्मा आणि मन्त्र्याचा पुत्र तारक यांनीं यानंतर शिवभक्तीचा खूप प्रचार केला.

दर्शनात् स्पर्शनाच्चैव स्मरणादपि पूजनात् ।
रुद्राक्षधारणाल्लोके मुच्यन्ते पातकैर्जनाः ॥

( सि. शि., ७।१७, पृ. १।७ )

या आचार्योक्तीत दर्शन, स्पर्शन तथा रुद्राक्षाच्या स्मरणानेंही पातकाची निवृत्ति होते, असें सांगितलें आहे. केवळ वीरशैवच नव्हेत, तर सर्व मानव-मात्रांनीं रुद्राक्ष धारण केला पाहिजे. रुद्राक्षांची माळ तयार करून ती घालतांना हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, रुद्राक्षाच्या मुखाशीं मुखाचा व पृष्ठाशीं पृष्ठाचा संबंध जुळवून माळ बनविली पाहिजे.

या प्रकारें रुद्राक्षधारणविधि गुरुमुखानें समजून घेऊन शास्त्रीय विधीनें धारणा केल्यानें पातकांची निवृत्ति होते. अशा प्रकारच्या शिवभक्ताचें रक्षण करण्यामुळें वीरशैव सिद्धान्तात रुद्राक्ष हें अष्टावरणांत पाचवें आवरण मानलें गेलें आहे.

—

# ६. मन्त्र

धृतश्रीभूतिरुद्राक्षः प्रयतो लिङ्गधारकः ।
जपेत् पञ्चाक्षरीविद्यां शिवतत्त्वप्रबोधिनीम् ॥

( सि. शि., ८।१, पृ. १२० )

आचार्यांच्या या उपदेशानुसार भस्म, रुद्राक्ष धारण केल्यानन्तर पंचाक्षर मंत्राच्या जपाचा विधि असतो. "मननात् त्रायत इति मन्त्रः" या व्युत्पत्ती-नुसार ज्याच्या मननानें रक्षण होतें, त्याला मन्त्र म्हणतात. शिवाचा साक्षात्कार घडविणारा पंचाक्षरी[1] मंत्र हा वीरशैवांचा प्रमुख मंत्र आहे. सप्तकोटी मंत्रांत हा सर्वश्रेष्ठ आहे.[2]

लोकांत ज्याप्रमाणें प्रत्येक व्यक्तीचें एक अभिधान ( नांव ) असतें, त्याप्रमाणेंच पंचाक्षरी मंत्र ( नमः शिवाय ) परशिवाचें अभिधान आहे. नांवाने हांक मारल्यानंतर त्या नांवाची व्यक्ति आपल्यासमोर येऊन उभी राहाते, तद्वतच या शिवाभिधान मंत्राच्या जपानें शिवाचा साक्षात्कार होतो.[3]

आदितः परिशुद्धत्वान्मलत्रयवियोगतः ।
शिव इत्युच्यते शम्भुश्चिदानन्दघनः प्रभुः ॥

---

१. नमः शब्दं वदेत् पूर्वं शिवायेति ततः परम् ।
मन्त्रः पञ्चाक्षरो ह्येष सर्वश्रुतिशिरोगतः ॥

( सि. शि., ८।७, पृ. १२३ )

२. सप्तकोटिषु मन्त्रेषु मन्त्रः पञ्चाक्षरो महान् ।
ब्रह्मविष्ण्वादिदेवेषु यथा शम्भुर्महत्तरः ॥

( सि. शि., ८।४, पृ. १२१ )

३. तस्याभिधानमन्त्रोऽयमभिधेयश्च स स्मृतः ।
अभिधानाभिधेयत्वान्मन्त्रात् सिद्धः परः शिवः ॥

( सि. शि. ८।६, पृ. १२२ )

आस्पदत्वादशेषाणां मङ्गलानां विशेषतः।
शिवशब्दाभिधेयो हि देवदेवस्त्रियम्बकः॥
( सि. शि., ८।८-९, पृ. १२३-१२४ )

या उक्तीत 'शिव' हीं दोन अक्षरें परशिवाचें अभिधान दाखवितात. पंचाक्षरातील अन्य तीन अक्षरांनीं जीव आणि त्याचें शिवाबरोबर अभेद बोधन केलें जातें.

सिद्धान्तशिखामणीचे संस्कृत भाष्यकार श्री मरितोण्टदार्यांनीं तें अशाप्रकारे समजावून सांगितलें आहे—

"शिवजीवैक्यप्रकाशनार्थं...अत्र नमस्कारेण जीवत्वं शिवशब्देन परब्रह्मत्वम् आयेत्यैक्यमय गताविति धातोरिति भावः"
( सि. शि. ८।७, तत्त्वप्रदीपिका व्याख्या, पृ. १२३ )

तात्पर्य, "नमः शिवाय" या पंचाक्षर मंत्रात 'नमः' शब्दानें जीवाचा बोध होतो, कारण नमस्कार करणारा उपासक असतो. अतः उपासक जीवच आहे. उपासकास समस्त मङ्गलपरम्परा देणारा उपास्य परब्रह्म 'शिव' या शब्दानें बोधित होतो. 'आय' शब्दानें त्या उपास्य-उपासक जीव-शिवाचा अभेद बोध होतो. अशाप्रकारें 'तत्त्वमसि' महावाक्याप्रमाणें अभेदबुद्धि उत्पन्न करण्याच्या कारणानें याला महामंत्र म्हणतात. म्हणूनच म्हटलें आहे—

शिवतत्त्वात् परं नास्ति यथा तत्त्वान्तरं महत्।
तथा पञ्चाक्षरीमन्त्रान्नास्ति मन्त्रान्तरं महत्॥
( सि. शि., ८।२, पृ. १२० )

या मन्त्राचीं मूलम्, विद्या, शिवः, शैवसूत्रं तथा पंचाक्षर हीं पाच सार्थ नांवे आहेत.[1] समस्त प्रपंचाच्या ( विश्वाच्या ) उत्पत्तीचें मूळकारण असल्यानें याला 'मूलम्' म्हटलें आहे. यासंबंधीं सांगितलें आहे कीं—

---

१. मूलं विद्या शिवः शैवसूत्रं पञ्चाक्षरस्तथा।
एतानि पञ्च नामानि पञ्चाक्षरमहामनोः॥
( सि. शि., ८।२३, पृ. १२९ )

पञ्चभूतानि सर्वाणि पञ्चतन्मात्रकाणि च।
ज्ञानेन्द्रियाणि पञ्चापि पञ्चकर्मेन्द्रियाणि च ॥
पञ्च ब्रह्माणि पञ्चापि कृत्यानि सह कारणैः।
बोध्यानि पञ्चभिर्वर्णैः पञ्चाक्षरमहामनोः ॥
पञ्चधा पञ्चधा यानि प्रसिद्धानि विशेषतः।
तानि सर्वाणि वस्तूनि पञ्चाक्षरमयानि हि ॥
( सि. शि., ८।१४-१६, पृ. १२५-१२६ )

याचें तात्पर्य असें आहे कीं, 'न'कारापासून सद्योजात ब्रह्म, गन्धतन्मात्रा, पृथ्वी, घ्राण ( नाक ) तथा गुद कर्मेन्द्रिय उत्पन्न झाले. 'म'कारापासून वामदेव ब्रह्म, रसतन्मात्रा, जल, जिव्हा, तथा गुह्येन्द्रिय प्रकट झाले. 'शि'कारापासून अघोर ब्रह्म, रूपतन्मात्रा, अग्नि, नेत्र तथा पाय हीं इन्द्रियें उत्पन्न झालीं. 'वा'कारापासून तत्पुरुष ब्रह्म, स्पर्शतन्मात्रा, वायु, त्वक् आणि हात इन्द्रिय प्रकट झालें. 'य'कारापासून ईशान ब्रह्म, शब्दतन्मात्रा, आकाश, श्रोत्र ( कान ) तथा वाक् इंद्रिय उत्पन्न झालें. इतकेंच नव्हे तर जगांत जितकीं पंचकें प्रसिद्ध आहेत, तीं सर्व ह्या पंचाक्षर मंत्रापासूनच उत्पन्न झालीं आहेत. तथा अन्य सर्व मंत्रांचें उद्गमस्थान[१] हेंच आहे. म्हणून या मंत्रास 'मूलम्' हें नांव दिलें गेलें आहे. पंचाक्षर मंत्रापासून उत्पन्न झालेले अनेक विवेचन चन्द्रज्ञान नांवाच्या आगम ग्रंथात केलें आहे. जिज्ञासूंनी अधिक माहितीसाठीं तो ग्रंथ वाचावा.[२]

या मन्त्राच्या मननानें शिव आणि जीवाच्या एकतेची बोधक शुद्धविद्येचा उदय होतो. म्हणून तिला 'विद्या' म्हणतात. याच्या जपानें अनेक कल्याणकारी परम्परांची प्राप्ती होत असल्यानें ह्याला 'शिव' ही म्हणतात. शिवासंबंधीं सर्व

१. सप्तकोटिमहामन्त्रा रूपवक्त्रैरनेकधा।
पञ्चाक्षरे प्रलीयन्ते पुनस्तस्माद्विनिर्गताः ॥
( च. आ. क्रि.; ८।४५ )

२. पहा—च. आ. क्रियापाद; ८।१४-४१.

विषय याच पांच अक्षरांत अत्यंत संक्षेपानें प्रतिपादिलेले आहेत. म्हणून याला "शैवसूत्र" म्हणतात. पांच अक्षरांनी संयुक्त असल्यामुळें याला 'पंचाक्षर' म्हणतात.

ॐकारपूर्वो मन्त्रोऽयं पञ्चाक्षरमयः परः ।
शैवागमेषु वेदेषु षडक्षर इति स्मृतः ॥
( सि. शि., ८।१७, पृ. १२६ )

या आचार्योक्तीनें, हा पंचाक्षर मंत्र जेव्हां ॐकारानें संयुक्त होतो, तेव्हां त्याला षडक्षर म्हणतात. या षडाक्षरास मूळपंचाक्षरही म्हणतात.

या षडाक्षर मंत्राच्या 'ॐ'कारानें शिवाचें निष्कल-स्वरूप आणि 'नमः शिवाय' या पंचाक्षरानें शिवाचें सकल-स्वरूप ( पञ्चब्रह्मतनु ) चा बोध होतो. सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष आणि ईशान या पांच मंत्रांनीं निर्मित शिवाचें शरीर 'सकल' या नावाने प्रसिद्ध आहे. येथें ब्रह्म शब्द मंत्रवाचक आहे. अशाप्रकारें हा षडक्षरमंत्र शिवाचें शुद्ध चिद्रूप निष्कल आणि प्रपंचरूप सकल या दोन्हीं स्वरूपांचा बोधक मानला जातो.[1]

दीक्षापूर्वं गुरोर्लब्ध्वा मन्त्रमाज्ञां समाहितः ।
सङ्कल्प्य च जपेन्नित्यं पुरश्चरणपूर्वकम् ॥
( च. आ. क्रियापाद, ८।४८ )

ह्या आगमोक्तीमध्यें श्रीगुरुकडूनच मन्त्रोपदेश घेण्याची आज्ञा आहे. अतः वीरशैव धर्मांचे आचार्य आपल्या गोत्राच्या अनुयायी भक्तांना ( स्त्री-पुरुषांना ) 'मन्त्रदीक्षा' करतेसमयीं या मंत्राचा उपदेश करतात. मंत्राच्या जपविधीच्या प्रसंगीं सांगितलें आहे कीं—

१. प्रणवेनैव मन्त्रेण बोध्यते निष्कलः शिवः ।
पञ्चाक्षरेण मन्त्रेण पञ्चब्रह्मतनुस्तथा ॥
निष्कलः संविदाकारः सकलो विश्वमूर्तितः ।
उभयात्मा शिवो मन्त्रे षडक्षरमये स्थितः ॥
( सि. शि., ८।२१-२२, पृ. १२८-१२९ )

पुस्तके लिखितान् मन्त्रान् आलोक्य प्रजपन्ति ये ।
ब्रह्महत्यासमं तेषां पातकं परिकीर्तितम् ॥

याचा अर्थ, गुरुच्या उपदेशाशिवाय जो कोणी पुस्तकात पाहून, विधि-विधान केल्याविणा जप करतो, त्याला सद्गति तर मिळतच नाहीं, उलट त्याला ब्रह्महत्येचें पातक लागतें. अतः कोणीही गुरुच्या उपदेशाशिवाय कोणत्याही मंत्राचा जप करू नये.

## मन्त्रजप

या मंत्राचे ऋषि वामदेव आहेत. हा पंक्ति छंदाचा मंत्र आहे. शिव हीच त्याची अधिष्ठातृ देवता आहे. ॐकारच बीज आहे. उमा शक्ति आहे. अशा-प्रकारें ऋषि आदि तथा न्यास आदि क्रम गुरुमुखानें जाणून प्राणायाम करून पूर्व अथवा उत्तर दिशेकडे बसून आपल्या इष्टलिंगास[१] साक्षी ठेवून १०८ वेळां किंवा अधिक वेळां यथाशक्ति रुद्राक्षमाळेनें याचा जप केला पाहिजे. मंत्रजपासाठीं अंगुलिरेखा, पुत्रजीवी, शंखमणि, मूँगा, स्फटिक, मोती, पद्मबीज, सुवर्ण, कुशाची ग्रन्थी तथा रुद्राक्षमाळ असावी. यामध्यें उत्तरोत्तर श्रेष्ठ मानले गेले आहे.[२]

---

१. यदिष्टलिङ्गं सम्पश्यन् वामहस्तस्थितं परम् ।
जपते तत्फलं वक्तुं न मया शक्यते गुरो ॥
( च. आ. क्रि, ८।७४ )

२. अङ्गुल्या जपसंख्यानादेकमेकमुदाहृतम् ।
रेखयाष्टगुणं विद्यात् पुत्रजीवैर्दशाधिकम् ॥
शतं स्याच्छङ्खमणिभिः प्रवालैस्तु सहस्रकम् ।
स्फटिकैर्दशसाहस्रं मौक्तिकैर्लक्षमुच्यते ॥
पद्माक्षैर्दशलक्षं तु सौवर्णैः कोटिरुच्यते ।
कुशग्रन्थ्या च रुद्राक्षैरनन्तफलमुच्यते ॥
( च. आ. क्रि. ८।६५–६७ )

अङ्गुष्ठं मोक्षदं विद्यात्तर्जनी शत्रुनाशिनी।
मध्यमा धनदा शान्तिं करोत्येव ह्यनामिका॥
कनिष्ठाऽऽकर्षणे प्रोक्ता जपकर्मणि गीष्पते।
(च. आ. क्रियापाद, ८।७०)

या आगमोक्तीच्या अनुसार रुद्राक्षमाळेनें जप करतेसमयीं अङ्गुष्ठानें जप केल्यानें मोक्षप्राप्ती, तर्जनीनें जप केल्यानें शत्रूचा विनाश, मध्यमानें जप केल्यास धनप्राप्ति, अनामिकेनें जप केल्यास शान्ति तथा कनिष्ठिकेनें जप केल्यास वशीकरण सिद्ध होतें. अतः साधकानें आपल्या इच्छेनुसार जप केला पाहिजे.

गुरुमुखानें उपदेशित या मंत्राचें अत्यन्त श्रद्धेनें शुद्ध उच्चारण केलें पाहिजे. अन्यथा नऊ प्रकारचे दोष होण्याचा सम्भव असतो. ते दोष येणेप्रमाणें— मूक, सुप्त, मृत, नग्न, वीर्यहीन, वृथाफल, भुजंग, कीलित आणि शून्य. न्यास केल्याशिवाय केलेला जप मूक म्हणविला जातो. शास्त्रोक्त आसनानें न बसता यथाकथंचित् केलेल्या जपानें सुप्त दोष होतो. प्रणव (ॐ) हें मंत्राचें शिर होय. अतः मन्त्राच्या सुरवातीस ॐकार नसल्यास तो मृत दोषानें आविष्ट होतो. नमः, स्वाहा, वषट्, हुं, वौषट् आणि फट् यातील कोणताही एक पल्लव रहित झाल्यास तो मंत्र नग्न म्हणविला जातो. याशिवाय अधिक वर्ण असल्यानें वीर्यहीन, गुरुकडून उपदेशित न झाल्यास वृथाफल, अर्थात् फलशून्य; ऋषि, देवता, तथा छन्दोहीन झाल्यास भुजंग, मध्येंच अनेक बीजाक्षरांनीं व्याप्त झाल्यास कीलित तथा आपण उच्चारलेला मंत्र दुसऱ्यानें ऐकल्यास शून्यनामक दोषानें ग्रस्त होतो. अतः जप करणाऱ्या साधकानें सावधानतेनें शास्त्रीय पद्धतीसाठीं गुरुकडून उत्तमप्रकारें समजावून घेऊन जप करावा.

अन्य आचार्यांनी ह्या दोषांची संख्या आठ दाखविली आहे. ते आठ दोष पुढीलप्रमाणें—

(१) अभक्त, (२) अक्षरभ्रान्ति, (३) लुप्त, (४) छिन्न, (५) ह्रस्व, (६) दीर्घ, (७) कथन आणि (८) स्वप्नकथन.

मंत्राला केवळ अक्षरसमूह मानून त्यांत श्रद्धा न ठेवणें हा अभक्त दोष होय. गुरु अथवा शिष्याच्या प्रमादानें मंत्राक्षरांचें विपरीत होणें ही अक्षरभ्रांति होय. मंत्राक्षरातील कोणत्याही एका अक्षराचा लोप होणें हा लुप्तदोष होय. संयुक्ताक्षर-मंत्रातील कोणतेही एक अक्षर सुटून जाणें हा छिन्नदोष होय. मंत्राक्षर दीर्घ असूनही त्याचा ह्रस्व उच्चारण करणें हा ह्रस्वदोष होय. तथा ऱ्हस्व अक्षरें असलेल्या मंत्राचा दीर्घ उच्चारण करणें दीर्घदोष ठरतो. सद्गुरुकडून उपदेशित मंत्र दुसऱ्यास सांगणें हा कथनदोष होय आणि स्वप्नांत कोणालाहीं सांगणें हा स्वप्नकथनदोष होय.

उपर्युक्त आठ दोषांतील अक्षरभ्रान्तीपासून स्वप्नकथनपर्यंतच्या सात दोषांची निवृत्ति करण्यासाठीं गुरुजवळ जाऊन पुन्हां मंत्रोपदेश घ्यावा लागतो. पहिला जो अभक्त दोष आहे, त्याची निवृत्ती आपल्या दृढश्रद्धेनेंच होते. या मन्त्रदोषांचें आणि त्यांच्या प्रायश्चित्ताचें विवरण हरितत्त्वदीधितिमध्यें केलें आहे. साधकास अत्यंत सावध राहून शुद्ध मंत्राचा श्रद्धेनें जप केला पाहिजे. तरच त्याला यथायोग्य फळ मिळूं शकतें.

हा जप वाचिक, उपांशु तथा मानसिक भेदानें तीन प्रकारचा आहे.[१] समीप असलेल्या व्यक्तीला जर मंत्राचें उच्चारण ऐकूं गेल्यास त्याला वाचिक म्हणतात. समीप असलेल्या व्यक्तीला ऐकूं तर जात नाहीं, पण ओठांची

---

१. जपस्तु त्रिविधः प्रोक्तो वाचिकोपांशुमानसः ।
श्रूयते यस्तु पार्श्वस्थैर्यथा वर्णसमन्वयः ॥
वाचिकः स तु विज्ञेयः सर्वपापप्रभञ्जनः ।
ईषत्स्पृष्ट्वाधरपुटं यो मन्दमभिधीयते ॥
पार्श्वस्थैरश्रुतः सोऽयमुपांशुः परिकीर्तितः ।
अस्पृष्ट्वाधरमस्पन्दि जिह्वाग्रं योऽन्तरात्मना ॥
भाव्यते वर्णरूपेण स मानस इति स्मृतः ।
( सि. शि., ८।२७–२९, पृ. १३०-१३१ )

हालचाल दिसते, त्याला उपांशु म्हणतात. ओठ आणि जीभ यांच्या हालचालीशिवायच या मंत्राचे अर्थ-स्वरूप परशिवाचे मनांत चिंतन करणें हा मानसिक जप होय. यांत मानसिक जपच श्रेष्ठ आहे.[1]

तत्पूर्वाभिमुखं वश्यं दक्षिणं चाभिचारिकम् ।
पश्चिमं धनलाभं च ह्युत्तरं शान्तिकं तथा ।।
वह्निना व्याधिपीडा च नैर्ऋत्या द्वेषणं तथा ।
वायुनाकर्षणं चैव ईशान्या मोक्षसंभवः ।।

ह्या उक्तीच्या आधारें पूर्वाभिमुख होऊन जप केल्यानें वशीकरण, दक्षिणाभिमुख होऊन जप केल्यानें मारण, उच्चाटन आदि अभिचारक्रिया, पश्चिमाभिमुखानें धनलाभ, उत्तराभिमुखानें शान्तिप्राप्ति, आग्नेयाभिमुखानें व्याधिपीडा, नैर्ऋत्याभिमुखानें द्वेष, वायव्याभिमुखानें आकर्षण, ईशान्याभिमुखानें मोक्षप्राप्ती होते. म्हणून जप करतेसमयीं आपल्या इच्छेनुसार आपल्या कामनेला ( इच्छा ) अनुरूप दिशा आणि अंगुलीकडे अवश्य ध्यान दिलें पाहिजे.

## पुरश्चरण

मन्त्रजपाच्या प्रसंगीं पुरश्चरणविधीही जाणून घेणें अनिवार्य आहे. गुरुनें उपदेशिलेल्या मंत्राचा, पुरश्चरण केल्याशिवाय कितीही जप केला, तरी तो सिद्ध होत नाहीं. चन्द्रज्ञान आगमात—

जपेदक्षरलक्षं वै चतुर्गुणितमादरात् ।
युक्ताशी संयमी यः स पौरश्चरणिकः स्मृतः ।।
यः पुरश्चरणं कृत्वा नित्यजापी भवेत् पुनः ।
तस्य नास्ति समो लोके स सिद्धः सिद्धिदो भवेत् ।।

( क्रियापाद, ८।५१-५२ )

---

१. उत्तमो मानसः प्रोक्त उपांशुर्मध्यमस्तथा ।
अधमो वाचिकः प्रोक्त इत्येतच्छिवशासनम् ।।
( च. आ. क्रियापाद; ८।५६ )

अशा प्रकारचा पुरश्चरणाचा विधि सांगितला आहे. तात्पर्य हें कीं, एका अक्षरास एक लाखाच्या हिशोबानें पुन्हां त्याला चौपट करून जप करणें यालाच पुरश्चरण म्हणतात. उदाहरणार्थ, 'नमः शिवाय' या पंचाक्षर मंत्रात पाच अक्षरें आहेत. अतः एका अक्षरास एक लाख ह्या हिशोबानें पाच लाख होतात. पुन्हां त्याची चौपट केल्यास वीस लाख होतात. अशाप्रकारें गुरुकडून मंत्रदीक्षा घेतल्यानंतर, प्रथम संयमी होऊन, एकाच ठिकाणीं बसून, उपर्युक्त विधीनें पुरश्चरण करून त्या जपाचा दशांश होम, होमाचा दशांश तर्पण, तर्पणाचा दशांश सदक्षिण भोजन करवून शान्ति केली पाहिजे. त्यानंतर दररोज नियमानें जप करीत राहिल्यानें मंत्र शीघ्र सिद्ध होतो. अन्यथा जप निष्फळ वाया जातात. अतः प्रत्येक व्यक्तीनें मन्त्राचें पुरश्चरण अवश्य केलें पाहिजे.

## मंत्राचे भेद

पंचाक्षर मंत्रच भिन्नभिन्न बीजाक्षरांनीं संयुक्त होऊन प्रसाद-पंचाक्षरी, माया-पंचाक्षरी, सूक्ष्म पंचाक्षरी, स्थूल पंचाक्षरी, तथा मूल-पंचाक्षरी अशा नावांनी पाच प्रकारचा होतो. हे क्रमशः दहा, नऊ, आठ, सात आणि सहा वर्णांचे असतात.[1] बीजाक्षरांनीं संयुक्त अशा पंचाक्षर मंत्रांचा उपदेश सर्वसाधारण व्यक्तीस केला जात नाहीं. या धर्माचे आचार्यच या मंत्रांचे अधिकारी असतात. वीर-गोत्राच्या आचार्यांना प्रसाद-पंचाक्षर मंत्राचा, नन्दिगोत्राच्या आचार्यांना माया-पंचाक्षर मंत्राचा, भृंगीगोत्राच्या आचार्यांना सूक्ष्म-पंचाक्षर मंत्राचा, वृषभगोत्राच्या आचार्यांना स्थूल-पंचाक्षर मंत्राचा आणि स्कंदगोत्राच्या आचार्यांना मूल-पंचाक्षर मंत्राचा उपदेश दिला जातो. हा उपदेश गुरुस्थानावर पट्टाभिषेक करतेवेळीं त्यांना दिला जातो.

---

| | |
|---|---|
| १. ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रैं ह्रौं नमः शिवाय । | ( प्रसाद-पञ्चाक्षर ) |
| ॐ ह्रां ह्रीं ह्रूं ह्रैं नमः शिवाय । | ( माया-पञ्चाक्षर ) |
| ॐ ह्रां ह्रीं ह्रूं नमः शिवाय । | ( सूक्ष्म-पञ्चाक्षर ) |
| ॐ ह्रां ह्रीं नमः शिवाय । | ( स्थूल-पञ्चाक्षर ) |
| ॐ नमः शिवाय । | ( मूल-पञ्चाक्षर ) |

प्रत्येक मंत्रात सुसिद्ध; सिद्ध, साध्य तथा रिपु ( शत्रु ) नांवाचे चार भेद असतात. परंतु पंचाक्षर मंत्र कोणाचाच शत्रु नाहीं. तर सुसिद्ध, सिद्ध आणि साध्य होतो. म्हटलेंच आहे—

न कदाचन कस्यापि रिपुरेष महामनुः ।
सिद्धो वाऽथ सुसिद्धो वा साध्यो वाऽथ भविष्यति ॥
( च. आ., क्रियापाद, ८।८८ )

जो गुरु शास्त्रोक्त पद्धतीनें मन्त्र स्वयंसिद्ध करून शिष्याला देतो, त्या मंत्राला सुसिद्ध म्हणतात. जो गुरु मंत्राच्या सिद्धीसाठीं प्रयत्न तर करतोच; पण सिद्ध होण्याच्या आधीच शिष्याला त्या मंत्राचा उपदेश देतो, त्याला सिद्धमंत्र म्हणतात. जो गुरु सिद्धीसाठीं प्रयत्न केल्याशिवायच उपदेश देतो, त्याला साध्य मंत्र म्हणतात.[1]

असाधितः साधितो वा सिध्यत्येष न संशयः ।
श्रद्धातिशययुक्तस्य शिवे मन्त्रे तथा गुरौ ॥
तस्मान्मन्त्रान्तरांस्त्यक्त्वा सापायानधिकारतः ।
आश्रयेत् परमां विद्यां हृद्यां पञ्चाक्षरीं बुधः ॥
( च. आ., क्रियापाद, ८।९०-९१ )

या आगमोक्तीनुसार उपदेश करणाऱ्या गुरुला तो मंत्र सुसिद्ध असो वा असिद्ध, परंतु शिष्यानें अत्यंत श्रद्धापूर्वक शास्त्रोक्त विधीनें त्याचा जप केल्यानें तो मंत्र सुसिद्ध होतो. मंत्र-जपात श्रद्धेची अत्यंत आवश्यकता आहे.

मंत्रजपात अनेक विधिविधानें आहेत. परंतु कोणी विधिविधान समजून न घेतां कशाहि प्रकारें आणि कोणत्याहि अवस्थेंत जप केला तरी श्रद्धेच्या बळानें तो जप सफल होतो.[2]

---

१. सिद्धेन गुरुणाऽऽदिष्टः सुसिद्ध इति कथ्यते ।
असिद्धेनाऽऽपि वा दत्तः सिद्धः साध्यस्तु केवलः ॥
( च. आ. क्रि., ८।८९ )

२. गच्छतस्तिष्ठतो वापि स्वेच्छया कर्म कुर्वतः ।
अशुचेर्वा शुचेर्वापि मन्त्रोऽयं न च निष्फलः ॥
( च. आ. क्रि., ८।८४ )

सदाचारविहीनस्य पतितस्यान्त्यजस्य वा ।
पञ्चाक्षरात् परं नास्ति परित्राणं कलौ युगे ।।

या आगमातील प्रमाणानें कलियुगात पतितांना पावन करण्यास पञ्चाक्षर मंत्राशिवाय अन्य कोणताच सरळ उपाय नाहीं.

या मंत्राचा महिमा पुढील सुंदर दृष्टांतात कथन केला आहे—

मथुरानगरीत दशार्ह नांवाचा एक यदुवंशीय राजा राज्य करीत होता. तो अत्यंत गुणवान्, उदार व शूरवीर होता. त्याच्या राज्यांत प्रजा आणि ब्राह्मण अत्यंत सुख-शांतीनें राहात असत. शेजारचे राजेही त्याला सन्मान देत असत. राजाची राणीही अत्यंत रूपवती आणि परमपतिव्रता होती. तिचें नांव कलावती होतें. एके दिवशीं राजा कामातुर होऊन आपल्या राणीजवळ रंग-महालांत गेला. राणी त्या दिवशीं व्रत करून शिवाच्या उपासनेंत रत होती. तिनें राजाला जवळ येण्यास मनाई केली. शास्त्राचा आदेश आहे कीं, व्रतस्थ स्त्रीबरोबर पुरुषाचा समागम होऊ नये. परंतु राजानें ऐकले नाहीं. तो राणीला आलिंगन देण्यास पुढें सरसावला. परंतु तो राणीच्या जवळ जाताच राणीच्या शरीराच्या तापानें त्याच्या सर्वांगाची लाही होऊं लागली. त्यानें चकित होऊन ह्या असह्य उष्णतेचें कारण विचारलें. राणी उत्तरली—"महाराज, मी शिव-मंत्राची दीक्षा घेतली आहे. त्याच्याच 'जपाचा हा महिमा होय. कोणताही मनुष्य मला व्रतापासून च्युत करू शकत नाहीं. आपली इच्छा असल्यास आपणही गर्गमुनीकडून दीक्षा घेऊन स्वतःला निष्पाप आणि सुरक्षित करूं शकतां."

कलावतीच्या मुखानें हें ऐकतांच राजा अत्यंत प्रसन्न झाला. तो गर्ग-मुनींच्या आश्रमास गेला. मुनींना साष्टांग प्रणाम करून राजानें शिवपंचाक्षरी मंत्र देण्यास त्यांना प्रार्थना केली. मुनींनी राजाला यमुना नदीत स्नान करवून शिवाची षोडशोपचारें पूजा करविली. त्यानंतर राजाने मुनींचा दिव्य रत्नांनी अभिषेक केला. मुनींनी प्रसन्न होऊन आपला वरदहस्त राजाच्या मस्तकावर ठेवला; आणि त्याला पंचाक्षरी ( षडक्षरी ) मंत्राचा उपदेश दिला. मन्त्र कानीं पड़तांच राजाच्या हृदयाकाशांत ज्ञानसूर्याचा उदय झाला. अज्ञानान्धकार

नष्ट झाला. मंत्राचा असा प्रभाव दिसूं लागला कीं क्षणभरांत राजाचीं सारी पापें त्याच्या शरीरातून कावळ्यांच्या रूपानें बाहेर पडलीं. त्यांच्यापैकीं कित्येकांचे पंख जळलेले होते. आणि कित्येक तडफडत जमिनीवर पडत होते. दावाग्नीनें ज्याप्रमाणें कण्टकवन दग्ध होऊन जातें, त्याप्रमाणेंच पापरूपी कावळे भस्मीभूत झाल्यानें राजाला महान् आश्चर्य वाटलें. त्यानें गर्गमुनींना विचारलें कीं, एकाएकीं माझें शरीर दिव्य कसें झालें ? मुनी म्हणाले, "तुझ्या शरीरातून निघालेले कावळे म्हणजे जन्मजन्मांतरीचीं तुझीं पापें होत. शिवपंचाक्षरी मंत्राच्या उपदेशानें निष्पाप करणाऱ्या परमगुरु गर्गमुनींना राजानें वारंवार वंदन करून त्यांचा निरोप घेऊन राजवाड्याकडे प्रस्थान केलें.[1]

अशा या मंत्राचा महिमा अद्‌भुत आहे. जे श्रद्धाळू आहेत, त्यांना या महिम्याची अनुभूति होते. या मंत्राचें मनन केल्यानें जनन-मरणात्मक संसार-सागरापासून साधकाचें रक्षण होतें.[2] अतः वीरशैव आचार्यांनीं पंचाक्षर मंत्र अथवा ॐकारयुक्त षडक्षर मंत्राला सहावें आवरण मानलें आहे.

---

१. पहा—कल्याणचा शिवाङ्क, पृ. ४६२-४६३.

२. मन्त्रेण पातकादीनि मुच्यन्ते सर्वजन्मनाम् ।
मननं सर्वपक्षेषु त्राणं संसारसागरात् ।
मननत्राणधर्मत्वात् मन्त्र इत्यभिधीयते ॥

# ७. पादोदक

परमानन्द एवोक्तः पादशब्देन निर्मलः ।
ज्ञानं चोदकशब्देन तयोरैक्यं तु दीक्षया ॥
( सि. शि., १९।८, पृ. १५७ )

अशाप्रकारें जगद्गुरु रेणुकाचार्यांनीं अगस्त्य ऋषींना पादोदक शब्दाची तात्त्विक परिभाषा सांगितली आहे. तात्पर्य हें कीं, "पद्यते गम्यतेऽनेन इति पदम्" या व्युत्पत्तीच्या आधारावर शिवाच्या परमानन्द स्वरूपाला 'पाद' आणि त्या आनंदाच्या ज्ञानाला 'उदक' म्हणतात. त्या दोहोंचे ऐक्य म्हणजेच 'पादोदक.' अर्थात् स्वस्वरूपाच्या आनन्दाचें ज्ञान हेंच पादोदक होय.

वीरशैवांच्या पूजापद्धतीनुसार गुरु, लिंग अथवा जंगमाच्या पादपूजेनें प्राप्त पवित्र चरणामृतासही पादोदक म्हणतात. यासाठीं कीं, भक्तिभावानें त्याचें सेवन केल्यानें मनाची मलिनता दूर होऊन स्वस्वरूपाच्या ज्ञानाच्या उदयाची योग्यता प्राप्त होते. अतः पादोदकाचा अक्षरार्थ असा सांगितला आहे—

पाकारं परमज्ञानं दोकारं दोषनाशनम् ।
दकारं दह्यते जन्म ककारं कर्मनाशनम् ॥

हें पादोदक तयार करण्याचा विशिष्ट विधि वीरशैव धर्मांत सांगितला आहे. केवळ पाद-प्रक्षालित जल पादोदक होत नाहीं. म्हणून शिष्यानें गुरु अथवा जंगमाच्या पायाच्या अङ्गुष्ठात रुद्र, तर्जनीत शंकर, मध्यमामध्यें महादेव, अनामिकेत त्र्यम्बक, कनिष्ठिकेत ईशान, पायाच्या वरील भागांत कपर्दि, पायतळीं सदाशिव, टाचेमध्यें रुद्र आणि भर्ग, अशाप्रकारें पायाची अंगुली तथा अन्य भागात शिवाच्या अनेक मूर्तींची भावना केली पाहिजे. तत्पश्चात् कनिष्ठिकेपासून अंगुष्ठापर्यंत बोटांत नकारापासून यकारापर्यंत पाच अक्षरांचा संबंध करून भस्म, गंध इ. सामग्रीनें पायाची पूजा केली पाहिजे. अशा-प्रकारें पायाच्या अंगुष्ठाचा वरून शुद्ध जलानें अभिषेक करून, अभिषिक्त

जल अंगुष्ठाच्या खालीं एक पात्र ठेवून साठवावें. पायाच्या पूजेनें प्राप्त झालेल्या ह्या चरणामृतास पादोदक म्हणतात.[1] हें पादोदक शिष्यासाठीं जितकें पवित्र मानलें जातें तितकेंच गुरुसाठीही पवित्र मानलें जातें. म्हणूनच शिष्यानें घेण्यांपूर्वीच गुरु आपलें चरणामृत प्राशन करतो. नंतर पादपूजा करणारा शिष्य प्राशन करतो. त्यानंतर त्या पूजेंत सम्मिलित असलेले सर्व लोक क्रमशः पादोदक सेवन करतात.

येथें एक शंका उपस्थित होते कीं, एकाच पात्रातून पहिल्या व्यक्तीनें पादोदक प्राशन केल्यानंतर तें उच्छिष्ट होतें, तर दुसरा कसा तें प्राशन करील ? त्याचें समाधान असें कीं, वीरशैव आचार्यांनीं पादोदक ग्रहण करण्यामध्यें सूतक मानलेलें नाहीं. ज्याप्रमाणें सोमयागात हविःशेष सोमरस चमस नावाच्या पात्रात एकत्र करून यज्ञशाळेचे सर्व ऋत्विज त्या चमस-पात्रानें सोमरसाचें पान करतात. तरी तेथें उच्छिष्ट सूतक मानलें जात नाहीं. त्याचप्रमाणें वीरशैव धर्मातही पादोदक घेतांना एका पात्रानें अनेक लोक पादोदक प्याल्यानें उच्छिष्ट सूतक होत नाहीं.[2]

हें पादोदक गुरुच्या पादपूजेनें प्राप्त झाल्यावर 'गुरु-पादोदक', जंगमाच्या पायाची पूजा करून प्राप्त होतें तें 'जंगम-पादोदक' आणि इष्टलिंगाच्या पूजेनें प्राप्त होतें तें 'लिंग-पादोदक' संबोधिलें जातें. यांनाच क्रमशः दीक्षा-पादोदक, शिक्षा-पादोदक आणि ज्ञान-पादोदकही म्हणतात.[3]

शोषणं पापपङ्कस्य दीपनं ज्ञानतेजसः ।
गुरोः पादोदकं चित्रं संसारभ्रमनाशनम् ॥

---

१. पहा—पारमेश्वर तन्त्र, ७।४७-५० ।

२. पहा—वीरशैवानन्दचन्द्रिका, पृ. ११९, सिद्धान्तशिखोपनिषत् वी. भाष्य, पृ. ५६-५७.

३. पादतीर्थं त्रिधा शम्भोर्गुरुजङ्गमयोरपि ।
दीक्षा शिक्षा ज्ञानमिति त्रिसंज्ञं तद् भवत्यहो ॥
(च. आ. क्रियापाद, ५।५)

सप्तसागरपर्यन्तं तीर्थस्नानफलं सदा ।
गुरोरङ्घ्रिपयोबिन्दुसहस्रांशं न पूरयेत् ॥
चरपादोदमहिमा वर्णितुं केन शक्यते ।
तद्धि मोचयितुं सद्यः शक्नुते तच्चराचरम् ॥
( च. आ. क्रियापाद, ५।१६; १८-१९ )

या आगमोक्तीन्त गुरु अथवा जंगमाचें पादोदक सेवन केल्यानें सर्व-प्रकारच्या पापांचा नाश होऊन ज्ञानज्योतीचा उदय होण्याचा महिमा वर्णिला आहे. गुरु अथवा जंगमाच्या पादोदकाचा एक बिन्दु मस्तकावर धारण केल्यानें सप्तसागरापर्यंत जितकीं तीर्थें आहेत, त्यांच्यामध्यें स्नान करण्याचें फळ मिळतें. अतः वीरशैव लोक यात्रा करतेसमयीं आपल्या गुरुलाही बरोबर घेऊन जातात; आणि तीर्थांत स्नान करतांना गुरुचें चरणकमल आपल्या मस्तकावर ठेवून स्नान करतात. महाराष्ट्रातील संत तुकाराम महाराज म्हणतात—

"ज्या सद्गुरुंची अंगुष्ठी । कोटि कोटि देवांची स्थिति."
"अड़सठ तीरथ गुरुचरण फिर भी होत अखण्ड ॥"

इत्यादि उक्तींनी पादतीर्थाचा महिमा गाईला आहे.

पादतीर्थं सदा पेयं भवबन्धमुमुक्षुभिः ।
गुरोरपीष्टलिङ्गस्य चरस्यापि विशेषतः ॥
( च. आ. क्रियापाद, ५।६ )

आगमाच्या या आज्ञेनुसार वीरशैव लोक प्रतिदिन त्रिविध पादोदक ग्रहण करतात. कदाचित् गुरु अथवा जंगमाचें पादोदक न मिळाल्यास लिंग-पादोदकांतच त्या दोघांची भावना करून तें स्विकारलें जातें. यालाच सम्बन्धाचार म्हणतात. या सम्बन्धाचाराच्या बळानें कोणतेही एक पादोदक मिळाल्यास अन्य दोहोंचा संबंध करून घेतला पाहिजे.[1]

१. गुरोश्चरस्य चालाभे इष्टलिङ्गपदोदकम् ।
लब्ध्वा गुर्वादिपादोदं भावयेन्मनसैव तत् ॥

अशाप्रकारें श्रद्धेनें विधिवत् प्रतिदिनीं गुरु, लिङ्ग तथा जंगमाचें पादोदक, अर्थात् चरणामृत सेवन केल्यानें साधकाच्या शारीरिक व मानसिक सर्व दोषांचें निवारण होऊन सदैव त्याचें रक्षण होतें. पादोदकास वीरशैव आचार्यांनीं सातवें आवरण अर्थात् रक्षणाचें कवच मानलें आहे.

---

चरवर्जं गुरोर्लाभे लब्ध्वा गुरुपदोदकम् ।
गुरुजङ्गमपादोदं लब्धवानिति भावयेत् ॥
गुरुवर्जं चरप्राप्तौ लब्ध्वा चरपदोदकम् ।
तदेव गुरुपादोदमिति मत्वा पिबेत्तदा ॥

( च. आ. क्रियापाद, ५।७–९ )

# ८. प्रसाद

वीरशैव अष्टावरणांत प्रसादास अन्तिम आठवें आवरण मानलें आहे. "नैर्मल्यं मनसो लिङ्गं प्रसाद इति कथ्यते" ( सि. शि., ९।१; पृ. १५८ ). या उक्तीच्या आधारावर मन सदैव प्रसन्न राहाणें हाच 'प्रसाद' होय. "अन्नमयं हि सौम्य मनः" ( छा. ६-५-४ ) या उपनिषदाच्या वाक्यांत भुक्तान्नाचा सूक्ष्म परिणामच मन मानलें गेलें आहे—

आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः, सत्त्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः,
स्मृतेर्लम्भे सर्वग्रन्थीनां विप्रमोक्षः ।।

( छा. ७-२६-२ )

या शास्त्रीय वचनांतही त्याच अर्थाचें समर्थन केलें आहे.

या प्रपंचात ( विश्वात ) भोग्य आणि धार्य या भेदांमुळें वस्तु दोन प्रकारची सांगितली आहे. यांत अन्न, जल आदि भोग्य तथा वस्त्र, अलंकार आदि धार्य ( धारण करण्याचे ) म्हणविले जातात. वीरशैवांचा हा सिद्धान्त आहे कीं, प्रत्येक व्यक्तीनें आपल्या भोग्य आणि धार्य वस्तु गुरु, लिंग तथा जंगमास समर्पित करून अवशिष्ट ( शिल्लक ) भाग प्रसादबुद्धीनें सेवन करावा.[1] यामुळें मनांत प्रसादगुण, अर्थात् प्रसन्नता उत्पन्न होते. मनाच्या प्रसन्नतेत निमित्त होत असल्यानें ह्या शिवार्पित वस्तूंना प्रसाद म्हटलें आहे.

---

१. पत्रं पुष्पं फलं तोयमन्नपानाद्यमौषधम् ।
असमर्प्य न भुञ्जीत भगवन्तं सदाशिवम् ।।
यदिन्द्रियागतं किञ्चिद्यत्सुखं तच्छिवार्पितम् ।
तत्प्रसादं च भोक्तव्यं तदिन्द्रियमुखेन वै ।।

( च. ज्ञा. क्रियापाद, ५।२४, २६ )

प्रसादादेव सा भक्तिः प्रसादो भक्तिसम्भवः ।
यथैवाङ्कुरतो बीजं बीजतो वा यथाङ्कुरः ॥
( सि. शि. ९।११, पृ. १४० )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनांत सांगितलें आहे कीं, भगवदर्पित प्रसाद सेवन केल्यानें भक्तीचा उदय होतो; आणि भक्ती असल्यानंतरच शिवार्पित वस्तूंमध्यें प्रसादाची वृद्धि असते. अशाप्रकारें बीज आणि अंकुरासमान भक्ति आणि प्रसाद यांचा अन्योन्य संबंध सांगितला गेला आहे. "तेन त्यक्तेन भुञ्जीथा:" ( ई. उ. १ ) उपनिषदाचा हा आदेश देखील प्रसादाचाच महिमा सांगतो.

पादोदकस्य पानेन सामीप्यं भजते सदा ।
मत्प्रसादोपभोगेन सारूप्यं प्रतिपद्यते ॥

स्वच्छन्दललितभैरव नावाच्या शिवागमाच्या या वचनांत शिवाचा प्रसाद सेवन करण्यांत शिवसारूप्याची प्राप्ति सांगितली आहे.

महाभारताच्या अनुशासन पर्वात प्रसादाचा महिमा वर्णन केला आहे. दुर्वास महर्षींचा भुक्तावशेष प्रसादाचा पायाशिवाय सर्वांगास लेप केल्यानें कृष्ण वज्रकाय झाले होते.[1]

भुञ्जीयाद् रुद्रभुक्तान्नं रुद्रपीतं जलं पिबेत् ।
रुद्राघ्रातं सदाजिघ्रेदिति जाबालिकी श्रुतिः ॥
अर्पयित्वा निजे लिङ्गे पत्रं पुष्पं फलं जलम् ।
अन्नाद्यं सर्वभोज्यं च स्वीकुर्याद् भक्तिमान्नरः ॥
( सि. शि., ९।४-५, पृ. १५८-१५९ )

अशाप्रकारें जगद्गुरु रेणुकाचार्यांनीं महर्षि अगस्त्य यांना जाबाल श्रुतीचें प्रमाण देऊन सर्व पदार्थ शिवार्पित करूनच भोजन करण्याचें विधान सांगितलें आहे.

---

१. दुर्वासोच्छिष्टलेपस्य पादबाह्याङ्गलेपनात् ।
सहसा वज्रकायत्वं प्राप्तवान् विष्णुरव्ययः ॥

श्री मरितोण्टदार्यांनीं या प्रसादाचे शुद्ध, सिद्ध तथा प्रसिद्ध असे तीन प्रकार मानले आहेत. त्यांचे तात्पर्य हें आहे कीं—गुरुच्या भोजनाच्या अवशिष्टास 'शुद्धप्रसाद', इष्टलिंगाचा नैवेद्य 'सिद्धप्रसाद' आणि जंगमाच्या भोजनाच्या अवशिष्टास 'प्रसिद्धप्रसाद' म्हणतात.[१]

येथें एक शंका उत्पन्न होते कीं, "न पर्युषितमश्नीयान्नोच्छिष्टं न कर्दथितम्" इत्यादि प्रमाणांनीं उच्छिष्ट तथा पर्युषित पदार्थाच्या भोजनाचा निषेध केला गेला आहे. अतः गुरु तथा जंगम आदींच्या भोजनानें अवशिष्ट ( अवशेष असलेला ) पदार्थ उच्छिष्ट असल्यामुळें तो कसा ग्रहण करता येणार ? याचें समाधान हें आहे कीं, शास्त्रांत सामान्य तथा विशेष या भेदांनी दोन नियम मानले जातात. सामान्याहून विशेष नियम नेहमीं बलवान असतो. जसें, "मा हिंस्यात् सर्वा भूतानि" हा सामान्य नियम पशुहिंसेचा निषेध करतो. परंतु "अग्नीषोमीयं पशुमालभेत" हा विशेष नियम पूर्वोक्त सामान्य नियमास बाधा आणून अग्नीसोम यज्ञांत पशुहिंसेचें विधान करतो. तसेंच जरी "न पर्युषितमश्नीयात्" हा नियम सामान्यतः उच्छिष्ट तथा पर्युषित भोजनाचा निषेध करतो, तरी "रुद्रेण भुक्तमश्नन्ति, रुद्रेण पीतं पिबन्ति, रुद्रेणाघ्रातं जिघ्रन्ति। तस्माद् ब्राह्मणाः प्रशान्तमनसो निर्माल्यमेव भक्षयन्ति" या विशेष श्रुतिमध्यें त्याला प्रसादबुद्धीनें सेवन करण्याचें विधान असल्यामुळें पूर्वश्रुति दुर्बल होते. मनुस्मृतीचे व्याख्याकार श्री कुल्लूक भट्ट यांनीही सांगितलें आहे कीं—

"उच्छिष्टं च भुक्तावशिष्टान्नमविशेषात् कस्यापि न भुञ्जीत। गुरूच्छिष्टं च विहितत्वाद् भोज्यम्" ( मनु. स्मृ. ४।२११ )

अशाप्रकारें उच्छिष्ट, अर्थात् उष्टया अन्नाचा सामान्यतः निषेध करूनही

---

१. शुद्धो गुरुमुखात् प्राप्तः सिद्धो लिङ्गमुखात्तथा।
प्रसिद्धो जङ्गममुखात् प्रसादस्त्रिविधो मतः॥
( वी. आ. च., पृ. १३२ )

गुरुच्या उच्छिष्टास ग्रहण करण्याचें विधान असल्यामुळें ह्या विशेष प्रसंगीं उच्छिष्ट दोष होत नाहीं.

अतः वीरशैव आचार्यांनीं सर्व शास्त्रांचें तात्पर्य समजून गुरु, लिङ्ग तथा जंगम यांचें पादोदक व प्रसाद स्वीकार करण्यानें उच्छिष्ट सूतकाचा दोष मानलेला नाहीं.

अशाप्रकारें शास्त्रसम्मत पूर्वोक्त शुद्ध, सिद्ध आणि प्रसिद्ध प्रसाद भक्तीपूर्वक सेवन केल्यानें त्याचाच सूक्ष्म तथा अन्तिम परिणाम शुद्ध मन तयार होऊन जातें. प्रसादसेवनानें उत्पन्न झालेल्या त्या मनांत सदा प्रसन्नता असते; आणि त्या प्रसन्न तथा परिशुद्ध चित्तातच आत्मज्ञानाची योग्यता उत्पन्न होते. अशा-प्रकारें प्रसादसेवनामुळें मनाचें दुर्व्यवहारापासून परिरक्षण होत असल्यानें प्रसादास वीरशैव आचार्यांनीं रक्षा-कवचरूपी आवरण मानलें आहे.

---

# उपसंहार

"श्रेयांसि बहुविघ्नानि" या उक्तीनुसार उत्तम मार्गावर चालणाऱ्यांना पदोपदीं संकटांना सामोरें जावें लागतें. साधनामार्गांत येणारीं विघ्नें दूर केल्याशिवाय कोणताही साधक आपल्या लक्ष्यापर्यंत पोहोचूं शकत नाहीं. अतः वीरशैव आचार्यांनीं भक्त, माहेश्वर, प्रसादी, प्राणलिंगी, शरण आणि ऐक्य या षड्विध मुक्तिसोपानाद्वारें परमतत्त्व प्राप्त होण्याची उत्कट अभिलाषा बाळगणाऱ्या साधकाला त्याच्या साधनामार्गांत कोणती बाधा उपस्थित होऊ नये, या उद्देशानें आठ प्रकारांच्या रक्षा-कवचांची व्यवस्था केली आहे. त्यांनाच 'अष्टावरण' या पारिभाषिक नांवाने संबोधिलें जातें. त्यांचा विस्तार आम्हीं करून दिला आहे. आतां संक्षेपात हा विचार करायचा आहे कीं हे अष्टावरण साधकासाठीं रक्षा-कवचाचें कार्य कोणत्या प्रकारें करतें.

गुरु पहिलें आवरण. शिष्याचा योगक्षेम गुरुवर निर्भर असल्यामुळें गुरु आपल्या शिष्याचे आणव, मायीय आणि कार्मिक हे त्रिविध मल वेधा, मान्त्री आणि क्रियादीक्षाद्वारें निवारण करून त्याचें शरीर, मन आणि बुद्धी परिशुद्ध करतो. त्याचबरोबर उपासनेसाठीं इष्टलिंग देऊन अत्यन्त सूक्ष्म प्राणलिंग तथा भावलिंगाचा उपासनाविधि समजावून देतो. भवारण्यात भटकणाऱ्या शिष्याचें अशाप्रकारें काम, क्रोध आदि दुष्ट वृत्तींपासून रक्षण करतो. अतः गुरु आपल्या समस्त शक्तींनी शिष्यासाठीं एक सुदृढ सुरक्षाकवच निर्माण करून 'आवरण' प्रस्तुत करतो.

गुरुच्या पवित्र करकमलांनीं सुसंस्कृत होऊन प्राप्त झालेल्या इष्टलिंग व उपदेशाद्वारें आपलें मन व भावनांत जागृत केल्या गेलेल्या प्राणलिंग आणि भावलिंगानेंच दुसऱ्या आवरणाची निष्पत्ति होते. दुष्ट कार्य करीत असतां कोणतीही व्यक्ति दुसऱ्यापासून तें लपवून ठेवण्याचा प्रयत्न करीत असते. त्याचें कारण हें आहे कीं, आपली चूक दुसऱ्याला समजल्यास समाजांत बेअब्रू होण्याचा

संभव असतो. सामान्यतः मनुष्य, आपल्या चुकीची माहिती दुसऱ्यास मिळू नये आणि समाजांत प्रतिष्ठा वाढत राहावी, या भावनेनें आविष्ट झालेला असतो.

मनुष्य कितीही चतुर असला तरी, आपले दुर्व्यवहार दुसऱ्यापासून लपवून ठेवील, परंतु स्वतःच्या मनापासून तो लपवू शकत नाहीं. आपल्या मनापासून जर तो लपवून ठेवू शकत नाहीं, तर सर्वव्यापी ईश्वरापासून कसा लपवून ठेवू शकेल ? तो सर्वव्यापी ईश्वरच इष्टलिंगाच्या रूपानें शरीरात; प्राणलिंगाच्या रूपानें मनांत आणि भावलिंगाच्या रूपानें बुद्धीत प्रकट होतो. म्हणून शिवदीक्षासंपन्न साधकास क्षणोक्षणीं शरीर, मन आणि बुद्धीत ईश्वराच्या अस्तित्वाचा बोध होत असतो. जर कोणी व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीसमोर दुर्व्यवहार करू शकत नाहीं, तर भगवत्सन्निधीत ( ईश्वराच्या सान्निध्यात ) साधक शास्त्रानें निषिद्ध मानलेल्या मार्गावर कसा प्रवृत्त होईल ?

आमच्या सर्वप्रकारच्या गुप्त आणि प्रकट व्यवहारांत पंचमहाभूतें, सूर्य, चन्द्र, आठ दिशांचे अष्ट दिक्पाल आणि सर्वत्र व्यापकरूपांत राहणारा परमात्मा, हे सर्व साक्षी असतात. त्याचें सूक्ष्म परिज्ञान स्वतःमध्यें नसल्यामुळें माणूस सुधारण्याऐवजीं अधिकच बिघडत चालला आहे. शास्त्रानें परमेश्वराचें सन्निधानकर्तृत्व आणि संकल्पकर्तृत्व हीं दोन सामर्थ्यें मान्य केलीं आहेत. संकल्प करून कार्य सिद्ध करणें हें संकल्पकर्तृत्व होय. ज्याच्या सान्निध्यानेंच कार्य सिद्ध होतें, त्याला सन्निधानकर्तृत्व म्हणतात. सूर्याच्या सान्निध्यानें कमल उगवतें आणि चिखल वाळून शुष्क होतो. येथें सूर्य कमल उगवण्याचा संकल्प करीत नाहीं, किंवा चिखल वाळविण्याचाही संकल्प करीत नाहीं. हें सर्व आपोआप प्रकृतीच्या स्वभावानें होतें.

चन्द्रकान्ते यथा तोयं सूर्यकान्ते यथाऽनलः ।
बीजे यथाऽङ्कुरः सिद्धस्तथाऽऽत्मनि शिवः स्थितः ॥
( सि. शि., ५।३५ )

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥
( गीता, १८।६१ )

अशाप्रकारें सिद्धान्तशिखामणि व भगवद्गीतेच्या प्रमाणांनीं, सर्व मनुष्यांच्या हृदयांत जर भगवानाचें सान्निध्य सिद्ध होतें, तर हृदयमन्दिरात भगवानाचें सान्निध्य असून देखील सर्वच प्राणी सुधारून शास्त्रशुद्ध मार्गावर कां चालत नाहींत ? अशी शंका आलोचकांच्या मनांत अवश्य उत्पन्न होते. म्हणून सन्निधानकर्तृत्वाचें रहस्य जाणून घेणें आवश्यक आहे.

प्रपंचात ( विश्वात ) जड आणि चेतन असे भेद असलेले दोन पदार्थ विद्यमान आहेत. ज्याला स्वतःचें व दुसऱ्याचें परिज्ञान नाहीं, त्याला जड म्हणतात. उदा. दगडवगैरे. ज्याला स्वतःचें आणि दुसऱ्याचें ज्ञान आहे, त्याला चेतन म्हणतात. उदाहरणार्थ मनुष्यवगैरे. जड पदार्थांत पुरुषार्थ नसल्यामुळें त्यांच्यांत जें परिवर्तन होतें तें प्रकृतीनें सहज होऊन जातें. परंतु मनुष्य चेतन व पुरुषार्थी प्राणी आहे. त्याला स्वतःमध्यें परिवर्तन घडवून आणण्यास स्वतः प्रयत्न करावा लागतो. प्राथमिक शाळेतील मुलें, वर्गात अध्यापक नसल्यावेळीं एकमेकांशीं झगडा व शिवीगाळी करीत असतात. त्यावेळीं अध्यापक वर्गात प्रवेश करून लपून उभे राहतात. तरी विद्यार्थ्यांना गुरुजींच्या सन्निधानाचें ज्ञान नसल्यानें त्यांचा झगडा चालूच असतो. लपून उभे असलेले गुरुजी जेव्हां त्यांच्यासमोर येतात, तेव्हां सर्व विद्यार्थी गुरुजींना पाहतांच आपला सर्व दुष्ट व्यवहार जिथल्या तिथें सोडून गप्प बसतात.

यावरून हें सिद्ध होतें कीं, मनुष्याच्या हृदयांत भगवान् स्थित असूनही त्याला त्याचें परिज्ञान नसल्यामुळें तो सन्मार्गावर प्रवृत्त होत नाहीं. अतः मनुष्याला सुधारण्यासाठीं त्याच्या हृदयांत केवळ परमेश्वराचें अस्तित्वच पर्याप्त नाहीं; तर त्याला त्याची सुदृढ माहिती असली पाहिजे. अध्यापकाला पाहून विद्यार्थी जसे भयभीत होतात, तद्वतच हृदयांत भगवानाचें अस्तित्व मानून साधक त्याच्या भयानें दुर्मार्गापासून निवृत्त होतो.

वीरशैव धर्माचे साधक आपल्या सद्गुरुच्या उपदेशानें मन आणि बुद्धीत परमेश्वराचें अस्तित्व प्राणलिंग तथा भावलिंगाच्या रूपांत जाणून घेऊन बुद्धीनें प्राणलिंग आणि भावलिंगाचें अनुसन्धान निरंतर करीत आपल्या त्रिकरणांस परिशुद्ध करून घेतो. त्या परिशुद्ध साधकाचा सांसारिक विषयाकडील मोह

क्षीण होत जातो. अशाप्रकारें हीं त्रिविध लिंगें उपासनेच्या माध्यमातून साधकाचा अध:पतनापासून बचाव करतात. म्हणून वीरशैव आचार्यांनीं ह्या त्रिविध लिंगांना दुसरें आवरण तथा रक्षाकवच मानलें आहे.

साधकाचें तिसरें आवरण जंगम आहे. 'जंगम' याचा अर्थ शिवज्ञानसंपन्न महापुरुष असा होतो.

जानन्त्यतिशयाद्ये तु शिवं विश्वप्रकाशकम् ।
स्वस्वरूपतया ते तु जङ्गमा इति कीर्तिता: ॥
( सि. शि., ११।२, पृ. १०४ )

सिद्धान्तशिखामणिच्या या वचनांत ही गोष्ट स्पष्ट होते. असे महापुरुष निरंतर संचरण करीत ज्ञानोपदेश करून भक्तजनांचे अज्ञान दूर करून सर्वांना सन्मार्गावर आणण्यासाठीं नेहमीं प्रयत्नशील असतात. म्हणूनच—

सर्वलोकोपकाराय यो देव: परमेश्वर: ।
चरत्यतिथिरूपेण नमस्ते जङ्गमात्मने ॥
( वी. चि., ३।३ )

वीरशैवचिन्तामणीच्या ह्या वचनांत लोककल्याणासाठीं संचलन करणाऱ्या अशा महापुरुषांना साक्षात् शिवाचें स्वरूप मानलें आहे.

म्हैसवगैरे पशूंना तलाव अथवा नदीच्या पाण्यानें स्वच्छ धुतलें तरी त्या स्वच्छतेचें त्यांना ज्ञान नसल्यामुळें पुन्हां चिखलांत जाऊन संपूर्ण शरीर मलिन करून घेतात. त्याचप्रमाणें कितीही शुद्ध आचरण करणाऱ्या व्यक्तीतही, स्वत:च्या आचरणाचें ज्ञान नसल्यामुळें म्हैस आदि प्रमाणें आपल्या दुर्व्यवहारानें आपलें पवित्र मन पापरूपी चिखलानें मलिन करून घेण्याचा संभव असतो. म्हणून भक्त व साधकांना त्यांचें आचरण व आत्मज्ञानाचा बोध करून त्यांना पतित होण्याच्या मार्गापासून वाचविणाऱ्या एका महापुरुषाची नितांत आवश्यकता असते.

वीरशैव धर्मांत ही आवश्यकता पूर्ण करणारा महापुरुषच 'जंगम' होय. या सम्प्रदायांत जो गुरुचा गुरु परमगुरु असतो, त्याला जंगम शब्दानें व्यवहृत

केलें जातें. साधनमार्गात प्रवृत्त असलेले साधक आरूढपतित न होवोत, ह्या करुणापूर्ण भावाने—

> काम: क्रोधश्च लोभश्च देहे तिष्ठन्ति तस्करा: ।
> ज्ञानरत्नापहाराय तस्माज्जाग्रत जाग्रत ॥

अशा प्रकारच्या उपदेशानें साधक व भक्तांना जागृत करून जंगम त्याचें रक्षण करीत असतो. ह्या जीवन्मुक्त महापुरुष जंगमास शिष्याच्या रक्षा-कवचाच्या रूपात तिसरें आवरण मानलें गेलें आहे.

अष्टावरणात चौथे स्थान भस्माचें आहे. वीरशैव सम्प्रदायात आगम व उपनिषदाद्वारें सांगितलेल्या पद्धतीनें शुद्ध गोमयानें भस्म निर्माण करतात. हें निर्माण करण्याचे विधि कल्प, अनुकल्प, उपकल्प व अकल्प या चार प्रकारचे आहेत. यांत कल्पविधीनें तयार केलेलें भस्म सर्वश्रेष्ठ मानलें जातें. शिवाच्या सद्योजात आदि पांच मुखांतून उत्पन्न झालेल्या नन्दा, भद्रा, सुरभि, सुशीला तथा सुमना या नांवाच्या पांच गायींच्या गोमयापासून सिद्ध केलेलें तें भस्म विभूति, भसित, भस्म, क्षार आणि रक्षा ह्या अर्थगर्भित शब्दांनीं संबोधिलें जातें.

अत्यन्त भक्तिभावानें धारण करणाऱ्यास ऐश्वर्य प्रदान करतें म्हणून 'विभूति', परमात्म तत्त्वास भासित करतें म्हणून 'भसित', पापांची भर्त्सना करतें म्हणून 'भस्म', आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक तापत्रयां-पासून प्राप्त होणाऱ्या विपत्तींचा क्षय करतें म्हणून 'क्षार' तथा भूत, प्रेत, पिशाच आदिपासून सुरक्षा करतें म्हणून त्याला 'रक्षा' म्हणतात.

नित्य कर्म करतेवेळीं विभूति, नैमित्तिक कर्म करतेवेळीं भसित, सर्वविध प्रायश्चित्तांचे वेळीं भस्म, काम्य कर्म करतेवेळीं क्षार, मोक्षप्राप्तीसाठीं निष्काम कर्म करतेवेळीं रक्षा, अशाप्रकारें पांच प्रकारांनी भस्मधारण करण्याचें विधान सांगितलें आहे.

भस्म धारण करतेवेळीं प्रथम मस्तकापासून पायापर्यंत भस्मलेपन केलें पाहिजे. याला भस्मस्नान म्हणतात. त्यानंतर शरीराच्या सर्वांगावर मन्त्रोच्चा-

रणपूर्वक भस्माची धूळ शिडकली पाहिजे. तिला उद्धूलन क्रिया म्हणतात. यानंतर शास्त्रोक्त विधीपूर्वक पंधरा ठिकाणीं त्रिपुण्ड्र धारण केल्यानें भस्म-धारणविधि पूर्ण होतो.

गोमयानें तयार केलेलें हें भस्म दररोज पुजेच्यावेळीं धारण केल्यानें शरीराची सुरक्षा होते. त्याचबरोबर मनांत एक पवित्र भावना निर्माण होते. ज्याप्रमाणें चुलीतील अग्नीचा भांड्याच्या बाहेरील भागाशीं प्रत्यक्ष संबंध येतो, पण त्याचबरोबर त्याच्या उष्णतेनें आंतील पदार्थ शिजतो, त्याचप्रमाणें सर्व दोष दूर करण्याचें सामर्थ्य असलेलें भस्म शरीरावर धारण केल्यानें शरीराच्या शुद्धीबरोबर मनांतील सर्व दोष दूर होऊन साधकाचें हृदय सद्भाव आणि शिवज्ञानानें परिपूर्ण होतें.

पाण्यानें पूर्ण भरलेल्या भांड्यात पुन्हां पाणी टाकल्यानें तें आंत प्रवेश न करतां बाहेर पडतें, तद्वतच दररोज भावनापूर्ण मनानें भस्म धारण केल्यानें साधकाचें मन शिवभावनेनें पूर्ण भरतें. शिवभावनेनें पूर्ण भरलेल्या त्याच्या हृदयांत सांसारिक वासनांना जागाच राहात नाहीं. अतः वैषयिक वासनांचा प्रभाव त्याच्या मनावर कधीं होऊं शकत नाहीं.

अशाप्रकारें भस्म भक्तांना बाह्य शारीरिक चर्मरोगांपासून आंतर विषयवासनांपासून सुरक्षित करून साधनामार्गात सहाय्यक होतें. अतः याचा-ही आवरणाच्या रूपांत अंगिकार करण्यांत आला आहे.

आवरणांमध्यें पाचवा क्रमांक 'रुद्राक्षा'चा लागतो. भगवान रुद्राच्या अक्षांतील ( नेत्रांतील ) थेंबापासून रुद्राक्षाची उत्पत्ति झाली आहे. रुद्रभग-वानाच्या सूर्यनेत्रापासून कपिलवर्णाचे बारा, चन्द्रनेत्रापासून शुभ्रवर्णाचे सोळा आणि अग्निनेत्रापासून कृष्णवर्णाचे दहा—असे एकूण अडतीस प्रकारचे रुद्राक्ष असतात. हे रुद्राक्ष एकमुखी रुद्राक्षापासून चौदामुखी रुद्राक्षापर्यंत असतात.

रुद्राक्ष शरीरावर धारण केल्यानें रक्तदाब, हृदयविकार आदि भयानक रोगांपासून सुटका झाल्याचें वैज्ञानिक प्रमाण उपलब्ध आहे. त्याचबरोबर रुद्राच्या पावन दृष्टीच्या समान असलेले रुद्राक्ष शरीरावर धारण केल्यानें

कोणत्याही दुष्टशक्तीची दृष्टी आपल्यावर कोणताही विपरित प्रभाव पाडू शकत नाहीं. म्हणून—

यस्याङ्गे नास्ति रुद्राक्ष एकोऽपि बहुपुण्यदः।
तस्य जन्म निरर्थं स्यात् त्रिपुण्ड्ररहितं यथा॥

( च. आ. क्रियापाद, ७।४६ )

चन्द्रज्ञान आगमाच्या ह्या वचनात त्रिपुण्ड्र धारण न करणाऱ्याचा जन्म जसा निरर्थक होतो, तसाच बहुपुण्यप्रद एक रुद्राक्ष जरी धारण केला नाहीं तरी मनुष्य-जन्म निरर्थक मानला जातो. आगम ग्रंथांत, केवळ रुद्राक्ष धारण केल्यानें कोटयावधि गायींचे दान केल्याचें पुण्य लाभतें असें प्रतिपादन केलें आहे—

दर्शनात् स्पर्शनाच्चैव स्मरणादपि पूजनात्।
रुद्राक्षधारणाल्लोके मुच्यन्ते पातकैर्जनाः॥

( सि. शि., ७।१७; पृ. ११७ )

या आचार्योक्तीमध्यें दर्शन, स्पर्शन तथा रुद्राक्ष यांच्या स्मरणानेंही पापांची निवृत्ति सांगितली आहे. तेव्हां, श्रद्धेनें धारण केल्यानें काय प्राप्त होऊं शकणार नाहीं? अतः केवळ वीरशैवच नव्हे तर मानवमात्रांनीहि रुद्राक्ष धारण केले पाहिजेत.

याप्रमाणें रुद्राक्ष साधकाच्या बाह्य आणि अंतरंगाची परिशुद्धि करून त्याचें रक्षण करतात. अतः त्याचाही आवरणकोटीत समावेश करण्यात आला आहे.

आवरणात मन्त्राचा सहावा क्रमांक लागतो. "मननात् त्राणधर्माऽसौ मन्त्रोऽयं परिकीर्तितः" संकेतपद्धतीच्या या वचनानुसार ज्याच्या मननानें मनुष्याचें रक्षण होतें तो मन्त्र होय. अशा प्रकारचे मंत्र एक दोन नव्हेत तर शास्त्रांत त्यांची संख्या सात कोटी सांगितलेली आहे. "सप्तकोटिषु मन्त्रेषु मन्त्रः पञ्चाक्षरो महान्" ( सि. शि , ८।४, पृ. १२१ ) आचार्यांच्या या उक्ती-नुसार त्या सात कोटी मंत्रांत पंचाक्षर मंत्र सर्वश्रेष्ठ आहे. हाच वीरशैवांचा

जप्य मन्त्र होय. हें शिवांचें अभिधान ( हांक मारण्याचें नांव ) आहे. याच्या आवृत्तीनें शिव प्रसन्न होऊन भक्तावर अनुग्रह करतात.

या मंत्राचीं मूल, विद्या, शिव, शैवसूत्र आणि पंचाक्षर अशीं पांच नांवें आहेत. अन्य सर्व मंत्रांचे हें उगमस्थान होय. म्हणून याला 'मूल' असें नामकरण करण्यांत आलें आहे. या मंत्राच्या मननानें शिव आणि जीव यांच बोध करणाऱ्या शुद्ध विद्येचा उदय होतो. म्हणून याला 'विद्या' म्हणतात. याच्या जपानें अनेक कल्याण परम्परांची प्राप्ती होते म्हणून याला 'शिव' म्हणतात. शिवासंबंधीचे सर्व विषय या पांच अक्षरांत अत्यंत संक्षेपानें प्रतिपादन केले आहेत. म्हणून याला "शैवसूत्र" म्हणतात. "नमः शिवाय" या पांच अक्षरांनीं संयुक्त असल्यामुळें याला 'पंचाक्षर' म्हणतात. हाच मंत्र जेव्हां 'ॐकारा'नें युक्त होतो तेव्हां त्याला षडक्षर मंत्र म्हटलें जातें.

मंत्राचा जप वाचिक, उपांशु आणि मानसिक भेदांनीं तीन प्रकारच मानला गेला आहे. त्यांत मानसिक जप अधिक फलदायी असल्यानें तो श्रेष्ठ आहे. म्हणून साधकाला आपल्या गुरुच्या मुखानें प्राप्त झालेल्या ह्या मंत्राचा नेहमीं मानसिक जप केला पाहिजे. याच्या आवर्तनांनीं मन पवित्र होतें.। त्याचबरोबर अन्तीं शिव-जीवाचें ऐक्यज्ञानसुद्धां जप करणाऱ्यास प्राप्त होतें.। अशाप्रकारें अनुसन्धान करणाऱ्या साधकास मंत्रानेंही रक्षण मिळतें, म्हणून त्याला आवरण संज्ञा मिळाली आहे.

सातवें आवरण 'पादोदक' आहे. गुरु, लिंग, जंगम यांच्या चरणामृतास पादोदक म्हटलें आहे.

पाकारं परमज्ञानं दोकारं दोषनाशनम् ।
दकारं दह्यते जन्म ककारं कर्मनाशनम् ॥

या प्रमाणानुसार पादोदक हें परमज्ञान देणारें, दोषांचा नाश करणारें, पुनर्जन्मास दग्ध करणारें तथा सर्व दुष्ट कर्मांचा नाश करणारें आहे.

प्रतिदिन जलसिंचन केल्यानें जसा वृक्ष वाढतो; तद्वतच नित्यनेमानें गुरु, लिंग, जंगम यांच्या पादोदकाचें सेवन केल्यानें भक्तीची वृद्धि होते. जर प्रति-

दिन तिन्हीं प्रकारचें पादोदक मिळालें नाहीं तर जें मिळेल त्यांत समाविष्ट असल्याची भावना करून सेवन केलें पाहिजे.

अशाप्रकारें पादोदक सेवन करणाऱ्याचे सर्व दोष दूर करून त्याला सन्मार्गांत प्रवृत्त करून दुर्मार्गापासून त्याचे रक्षण करतें. म्हणून तेंही आवरण मानलें गेलें आहे.

वीरशैव अष्टावरणांत प्रसाद हे अंतिम आवरण आहे. परमेश्वरास अथवा गुरु, जंगमांस अर्पण केल्यानंतर शिल्लक राहिलेलें अन्नच 'प्रसाद' होतो. आहारशुद्धि मनाच्या शुद्धीत कारण बनते. कारण अन्नाचें सूक्ष्म परिणामच मन बनतें. मनाच्या शुभ आणि अशुभ वासनांमुळेंच मनुष्यास सद्गति अथवा दुर्गति प्राप्त होते.

सद्गति मिळण्याची इच्छा बाळगणाऱ्या व्यक्तीला आपलें मन सद्भावनांनीं संयुक्त करून सदैव प्रसन्न राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. तशा प्रसन्नतेची प्राप्ति—

नैर्मल्यं मनसो लिङ्गं प्रसाद इति कथ्यते ।
शिवस्य लिङ्गरूपस्य प्रसादादेव सिद्धयति ।।

( सि. शि., ११।६ )

सिद्धान्तशिखामणीच्या या वचनानुसार, ईश्वराच्या प्रसादसेवनानेंच प्राप्त होते. म्हणून साधकास नेहमीं 'प्रसाद-भोजी' असलें पाहिजे. स्वच्छन्द-ललित-भैरवतंत्रात तर प्रसादसेवनानें सारूप्य मुक्तीची प्राप्ति सांगितलेली आहे.

गुरुच्या भोजनाच्या अवशिष्ट भागास शुद्धप्रसाद, इष्टलिंगाच्या नैवेद्यास सिद्धप्रसाद आणि जंगम भोजनाच्या अवशिष्ट भागास प्रसिद्धप्रसाद म्हणतात. यथासमय ह्या तिन्हीं प्रकारच्या प्रसादांचें सेवन करून साधकाचें मन परिशुद्ध होतें. अशाप्रकारें प्रसादही मनशुद्धीद्वारें आमचें रक्षण करतो. म्हणून 'प्रसाद' हेंही एक आवरण आहे.

## अन्तरंग अष्टावरण

भारतीय दार्शनिकांनीं जीवात्म्याच्या व्यावहारिक आणि आध्यात्मिक मार्गांत साधनीभूत स्थूल शरीर तथा त्याच्या इंद्रियांस बहिरंग, आणि मन,

बुद्धि इत्यादींना अंतरंग मानलें आहे. ह्या दोन्हीं अंगांना रक्षाकवचांची आवश्यकता असल्यामुळें वीरशैव आचार्यांनीं अष्टावरणांचे 'अन्तरंग-अष्टावरण' आणि 'बहिरंग-अष्टावरण' असे भेदामुळें दोन भाग केले आहेत. आतांपर्यंत विवरण केलेल्या आवरणांना बहिरंग-अष्टावरण म्हटलें जातें. आतां अन्तरंग-अष्टावरणासंबंधी विचार करूंया.

दीक्षा करून, शिक्षण देऊन आणि ज्ञानोपदेशाच्याद्वारें जो महापुरुष आमच्या स्थूल शरीराचा दुर्मार्गापासून बचाव करून रक्षण करतो, त्याला गुरु म्हणतात. त्याची गणना बहिरंग-अष्टावरणांत केली जाते. त्या गुरुनें उपदेश केलेला बोध अथवा नैतिक ज्ञान आमच्या मन व बुद्धीला दुष्ट विषयाच्या चिन्तनापासून दूर ठेवतें. अतः अन्तरंगात गुरुचें स्थान ज्ञानाला प्राप्त होतें. म्हणून 'ज्ञान' हेंच अन्तरंग गुरुरूप प्रथम आवरण होय.

वीरशैव सिद्धान्तात उपासनेसाठीं स्वीकारलेले इष्टलिंग, प्राणलिंग व भावलिंग या त्रिविध लिंगांत इष्टलिंग स्थूलशरीरावर असतें. म्हणून तें बहिरंग-आवरण मानलें गेलें आहे. बाकीचीं दोन लिंगें प्राणलिंग व भावलिंग क्रमशः मन आणि बुद्धीमध्यें प्रकट होऊन साधकाचें मन तथा बुद्धीचें दुर्मार्गापासून रक्षण करतात. म्हणून प्राणलिंग व भावलिंगास अन्तरंग रक्षाकवचरूप आवरण मानलें आहे.

ज्याप्रमाणें गुरुनें उपदेशिलेलें नैतिक ज्ञान अन्तरंगाचें आवरण मानलें गेलें आहे, त्याप्रमाणेंच शिवज्ञानसंपन्न जीवन्मुक्त महापुरुष जंगमाद्वारें उपदेशित तत्त्वज्ञान साधकाच्या अन्तरंगात प्रादुर्भूत होऊन, अज्ञानामुळें होणाऱ्या पुनःपुनः जननमरणात्मक भवचक्रापासून त्याचें रक्षण करतें. म्हणून जंगमाद्वारें उपदेशित तत्त्वज्ञानच अंतरंगाचें तिसरें आवरण होय. त्यालाच अंतरंगाचा जंगम म्हटलें जातें.

पाच प्रकारच्या गोमयापासून बनलेले पंचविध भस्म बहिरंग-आवरण आहे. हें भस्म अंतरंगात धारण करण्यायोग्य नाहीं. अतः

महाभस्मेति संचिन्त्य महादेवं प्रभामयम् ।
वर्तन्ते ये महाभागा मुख्यास्ते भस्मधारिणः ॥

( सि. शि., ७।२ )

श्री रेणुकभगवत्पादांच्या या वचनानुसार मनांत महादेवाचें चिन्तन करणें हेंच अंतरंग भस्मधारण होय. तात्पर्य हें कीं—"स एष भस्मज्योतिस्स एष भस्मज्योतिः" या भस्मजाबाल श्रुतीच्या आदेशानुसार ज्योतिर्लिंग-स्वरूप परशिवात साधकाची मनोवृत्ति लीन होऊन जेव्हां चेतनस्वरूप होते, तेव्हां तिला चिद्भस्मधारण म्हणतात. "भासनात् प्रकाशनाद् भसितम्" या व्युत्पत्तीनुसार चिद्रूपानें प्रकाशमान झाल्यानें परशिवास भस्म म्हणणें उचित आहे. हें परमात्मचिन्तनरूप चिद्भस्म धारण केल्यानें मनाच्या संकल्पविकल्पात्मक भावना नष्ट होऊन जातात, आणि साधक सदा शिवानन्दात विलीन होऊन जातो. अशाप्रकारें गोमयानें तयार झालेलें भस्म बहिरंग-आवरण आणि चिद्रूप परमात्म्याचें मनांत चिंतन करणें हें अन्तरंग भस्मधारण होय. हें अंतरंग-आवरणाचें चौथें आवरण होय.

रुद्राच्या नेत्रजलापासून रुद्राक्ष उत्पन्न झाला आहे. तो स्थूल शरीरावर धारण करण्यायोग्य आहे. अन्तरंगात तो धारण करणें असंभव आहे. म्हणून अन्तरंगासाठीं तात्त्विक रुद्राक्षाची आवश्यकता असते. रुद्राक्षाचा अर्थ रुद्राचा नेत्र असा होतो. त्या रुद्राची दृष्टी प्राप्त करणें हेंच अन्तरंग रुद्राक्षधारण होय. तात्पर्य—

विद्याविनयसम्पन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ॥

(गीता, ५।१८)

गीतेच्या या वचनानुसार सर्वांत समभाव पाहणें अथवा सर्वांत भगवान् रुद्रास पाहणें हेंच अंतरंग रुद्राक्ष-धारण होय. अन्तरंगात ही भावना उदित झाल्याशिवाय बहिरंगात कितीही रुद्राक्ष धारण केले तरी त्याचें काहीं महत्त्व नाहीं. ज्याप्रमाणें स्थूल शरीरावर अनेक रुद्राक्षमाला धारण करतात, त्याप्रमाणेंच मनांतून निघणाऱ्या अनेक वृत्तींत त्याच रुद्रास पाहणें ही अन्तरंगाची अक्षमाला होय. अशाप्रकारें शिवदृष्टी प्राप्त करणें हेंच अन्तरंग रुद्राक्षधारण होय. हें अन्तरंगाचें पाचवें आवरण होय.

परशिवाचें अभिधानरूप "नमःशिवाय" या पंचाक्षर मंत्राचा जप करणें हें बहिरंग-आवरण होय. या मंत्राच्या निरंतर जपानें साधकाच्या मनांत—

नमःपदं तत्खलु जीववाचि शिवःपदं तत्परमात्मवाचि ।
अयेति तादात्म्यपदं तदेतद् नमः शिवायेति जगाद मन्त्रः ॥
( अनु. सू. ६।४६ )

श्री मायिदेवांच्या या वचनानुसार, 'नमः'चा अर्थ जीवात्मा, 'शिव' शब्दाचा अर्थ परमात्मा आणि 'अय'चा अर्थ दोहोंच्या एकतेचें ज्ञान. अशाप्रकारें शिव-जीव ऐक्याचें ज्ञान दृढ होत जातें; तेव्हां तें अभेदज्ञानच अन्तरंगाचा मंत्र संबोधलें जातें. म्हणून पंचाक्षर मंत्र बहिरंग-आवरण आहे, आणि शिव-जीव यांच्या ऐक्याचें ज्ञान हें अन्तरंगाचें आवरण होय. हें ऐक्यज्ञान अंतरंग-आवरणात सहावें आवरण होय.

बहिरंग-अष्टावरणात, गुरु, लिंग आणि जंगम यांच्या पादपूजाविशेषानें प्राप्त होणाऱ्या पवित्र जलास पादोदक म्हणतात. परंतु अन्तरंग-अष्टावरणांत—

परमानन्द एवोक्तः पादशब्देन निर्मलः ।
ज्ञानं चोदकशब्देन पादोदकमिति स्मृतम् ॥
अथवा पादशब्देन गुरुरेव निगद्यते ।
शिष्यश्चोदकशब्देन तयोरैक्यं तु दीक्षया ॥
( सि. शि. १९।७-८ )

श्री जगद्गुरु रेणुकाचार्यांच्या या वचनानें स्वकीय आनन्दरूपास पाद आणि त्याच्या ज्ञानास उदक कल्पून त्यानुसार आपल्या आत्म्याच्या आनन्द-स्वरूपाचा दृढ बोध होणें हेंच पादोदक होय. जसें बहिरंगात गुरु, लिंग अथवा जंगम यांच्या पादतीर्थाचें पान करण्यानें तृप्ति मिळते, तद्वतच स्वतःच्याच आनंदस्वरूपाचा बोध झाल्यानंतर साधकास परम तृप्ति मिळते. अतः त्या आनंदबोधास पादोदक म्हटलें जातें.

हा बोध गुरुच्या उपदेशानें प्राप्त होतो. म्हणून पाद शब्दाचा अर्थ गुरु व उदक शब्दाचा अर्थ शिष्य होय. अशाप्रकारें बोध्य आणि बोधक यांच्या रूपांत विराजमान असलेल्या त्या दोहोंच्या अभेद ज्ञानानें एक आगळी

तृप्ति प्राप्त होते. अतः तिलाही पादोदक म्हणतात. बहिरंग-अष्टावरणांत मानले गेलेले गुरु, लिंग आणि जंगमाच्या पादतीर्थाचें प्रतिदिन सेवन केल्यानें याप्रकारें स्वरूपानन्दाचें ज्ञान आणि गुरुशिष्याचा ऐक्यबोध उत्पन्न होतो. हें ज्ञानच अन्तरंग पादोदक संबोधलें जातें. अन्तरंग-अष्टावरणांत त्याचें सातवें स्थान आहे.

अंतिम आवरण प्रसाद. बहिरंगात गुरु, लिंग आणि जंगम यांच्या उपभोगानंतरचें अवशिष्ट पवित्र अन्नआदीस प्रसाद म्हटलें आहे. श्रद्धेनें तें प्रतिदिन सेवन केल्यानें मनांत प्रसन्नता उत्पन्न होते.

नैर्मल्यं मनसो लिङ्गं प्रसाद इति कथ्यते ।
शिवस्य लिङ्गरूपस्य प्रसादादेव सिद्ध्यति ।।

( सि. शि. ११।६ )

श्री ज. रेणुकाचार्यांच्या या उपदेशानुसार मनाची ती प्रसन्नताच अन्तरंगप्रसाद म्हणविली जाते. मनाच्या या प्रसन्नतेस शास्त्रांत 'अन्तःकरण-कृपा' म्हटलें आहे. तत्त्वज्ञान प्राप्त करण्यासाठीं ईशकृपा, वेदकृपा, गुरुकृपा आणि अन्तःकरणकृपा अशा चतुर्विध कृपांची आवश्यकता असते. त्यांत अंतःकरणकृपा अतिशय महत्त्वाची आहे. सर्व कृपा असूनसुद्धां जर आमचें मन स्थिर आणि प्रसन्न नसलें, तर कोणतेंही ज्ञान प्राप्त होणार नाहीं. म्हणून मनाच्या प्रसन्नतारूप हें अंतिम आवरण सर्वांनीं अवश्य संपादन केलें पाहिजे

अशाप्रकारें अज्ञान दूर करणारें सामान्य ज्ञानच अन्तरंगाचा गुरु होय. प्राणलिंग व भावलिंग हेच अन्तरंगाचे 'लिंग' होत. तत्त्वज्ञानच अन्तरंगाचा जंगम होय, चिद्रूप परमात्म्याचें चिंतनच अन्तरंगाचें भस्म होय. सर्व वस्तू आणि व्यक्तींमध्यें रुद्रास पाहणें अन्तरंग रुद्राक्ष होय. शिवजीवाच्या ऐक्याचा बोध होणें हा अन्तरंग मंत्र होय. स्वकीय परमानन्दस्वरूपाचा दृढबोध अथवा गुरुशिष्यांत असणारा बोध्य-बोधक भेद निवृत्त झाल्यानंतर दोघांत अभेदज्ञान होणें हेंच अन्तरंगाचे पादोदक होय. आणि मन सदैव प्रसन्न राहणें हाच अन्तरंगाचा प्रसाद होय.

पूर्वोक्त बहिरंग-अष्टावरणांत श्रद्धा ठेवून यथोक्त विधीनें आचरण करणाऱ्यांस हीं अन्तरंग-आवरणें प्राप्त होतात. अन्तरंग-आवरण प्राप्त करणें मनुष्यमात्राचें लक्ष्य असलें पाहिजे. अतः केवळ वीरशैवच नव्हे तर प्रपंचातील ( विश्वातील ) प्रत्येक मनुष्यास प्रथम बहिरंग-अष्टावरणांत पूजनीय स्थानांत विराजमान असलेले गुरु, लिंग, जंगम यांमध्यें पूजेच्या सामग्रीच्या रूपांत विद्यमान असलेली विभूति, रुद्राक्ष तथा मंत्र आणि पूजेच्या फलस्वरूप पादोदक, प्रसाद यांमध्यें अत्यंत श्रद्धा ठेवून अन्तरंग-अष्टावरण प्राप्त करून जीवन सार्थक केलें पाहिजे.

अनुवाद

ग्रन्थ-लेखन

प्रारंभ—रविवार दि० ६-७-१९८५
रात्री ९ वाजतां

समाप्ती—शनिवार दि० १२-७-१९८५
दुपारीं २ वाजतां

स्थळ—सोलापूर

---

## द्विविध अष्टावरण-तालिका

| बहिरंग-अष्टावरण | अन्तरंग-अष्टावरण |
| --- | --- |
| **( १ ) श्री गुरु**<br>दीक्षा, शिक्षा आणि ज्ञानोपदेश करणारा आचार्य. | **( १ ) ज्ञान**<br>नित्यानित्य आणि आत्मानात्माचा विवेक. |
| **( २ ) लिंग**<br>क्रियादीक्षेत सद्गुरुच्याद्वारें प्रदत्त सुसंस्कृत इष्टलिंग. | **( २ ) प्राणलिंग आणि भावलिंग**<br>मान्त्रदीक्षा आणि वेधदीक्षेत श्री गुरुद्वारें उपदिष्ट सूक्ष्म आणि परात्पर लिंग. |
| **( ३ ) जंगम**<br>तत्त्वज्ञानाचा उपदेश करणारा जीवन्मुक्त महाशिवयोगी अथवा परमगुरु. | **( ३ ) तत्त्वज्ञान**<br>शिव-जीव अथवा लिंग-अंगाचें सामरस्य ज्ञान. |
| **( ४ ) विभूति**<br>शिवाच्या सद्योजात आदि पांच मुखांपासून उत्पन्न झालेल्या पाच गायींच्या गोमयापासून तयार केलेली. | **( ४ ) चिद्भस्म**<br>चिद्रूप परशिवाचें मनांत सदा चिन्तन करणें. |
| **( ५ ) रुद्राक्ष**<br>श्री रुद्राच्या नेत्रजलापासून उत्पन्न एक पवित्र वृक्षविशेषाचें बीज. | **( ५ ) रुद्रदृष्टि**<br>सर्व व्यक्ति आणि वस्तूमध्यें रुद्रासच पाहण्याची विशाल दृष्टि. |

**( ६ ) मन्त्र**

पञ्चाक्षर महामन्त्राचा आवृत्ति-रूप जप.

**( ७ ) पादोदक**

गुरु, लिंग, जंगम यांच्या पादपूजा विशेषानें प्राप्त होणारें पवित्र तीर्थ.

**( ८ ) प्रसाद**

गुरु, लिंग; जंगम यांच्या भोजनातून अवशिष्ट पवित्र अन्न.

**( ६ ) तत्त्वमसि**

शिव-जीवाच्या ऐक्यबोधाचें निरन्तर मनन करणें.

**( ७ ) परमानन्दज्ञान**

आपल्यां स्वरूपाच्या निरन्तर चिन्तनाने प्राप्त होणारा आत्मानन्दाचा अनुभव.

**( ८ ) प्रसन्नता**

पवित्र अन्नाचे सेवन आणि परमात्मचिन्तनाने प्राप्त झालेली मनाची स्थिती.



# सहायकग्रन्थसूची

**संस्कृत ग्रन्थ**

(१) अनुभवसूत्रम्, (तन्त्रसंग्रहः, भाग० १) सं० सं० वि० वि०, वाराणसी १९७० ई०।

(२) ईशाद्यष्टोत्तरशतोपनिषदः, नि० सा० प्रेस, बम्बई १९२५ ई०।

(३) ऋग्वेदसंहिता, वैदिक संशोधन मण्डल, पुणे १९४१ ई०।

(४) एकाक्षरनामकोषसंग्रहः, राजस्थान प्राच्य० वि० प्रतिष्ठान, जोधपुर १९६४ ई०।

(५) क्रियासारः, भाग १–३, प्राच्य विद्या संशोधनालय, मैसूर १९५४, ५७, ५८ ई०।

(६) गुरुवंशकाव्यम्, वाणी विलास मुद्रणालय, श्रीरङ्गम्।

(७) चन्द्रज्ञानागमः, काशीनाथ ग्रन्थमाला, मैसूर १९५६ ई०।

(८) न्यायकोशः, भण्डारकर प्राच्य विद्या संशोधनालय, पुणे १९२८ ई०।

(९) पातञ्जलयोगदर्शनम्, चौखम्बा संस्कृत संस्थान, वाराणसी १९७० ई०।

(१०) पारमेश्वरतन्त्रम्, वीरशैव लिङ्गी ब्राह्मण ग्रन्थमाला, सोलापुर १९०४ ई०।

(११) ब्रह्मसूत्रश्रीकरभाष्यम्, प्राच्यविद्यासंशोधनालय, मैसूर १९७७ ई०।

(१२) भास्करी, सरस्वती भवन टेक्स्ट नं० ८३, इलाहाबाद १९५० ई०।

(१३) मनुस्मृति, खेमराज प्रेस, बम्बई १९४५ वि० सं०।

(१४) महाभारतम् (शान्तिपर्व, वनपर्व), चित्रशाला प्रेस, पुणे १९३०, ३२ ई०।

(१५) योगसूत्रभाष्यम्, तत्त्ववैशारदीसहितम्, जीवानन्द विद्यासागर, कलकत्ता १९४० ई०।

(१६) रत्नत्रयम्, वाणी विलास मुद्रणालय, श्रीरङ्गम् १९२३ ई०।

(१७) लिङ्गधारणचन्द्रिका, जंगमवाडीमठ, वाराणसी १९०५ ई० ।
(१८) वातुलशुद्धाख्यतन्त्रम्, ( तन्त्रसंग्रहः, भाग० १ ) सं० सं० वि० वि०, वाराणसी १९७० ई० ।
(१९) वीरशैवधर्मशिरोमणिः, कन्यका परमेश्वरी प्रेस, मैसूर १९०८ ई० ।
(२०) वीरशैवसदाचारसंग्रहः, वी० लि० ब्रा० ग्रन्थमाला, सोलापुर १९०५ ई० ।
(२१) वीरशैवचिन्तामणिः, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड़ १९७१ ई० ।
(२२) वीरशैवानन्दचन्द्रिका, मूरुसाविरमठ; हुबली १९३६ ई० ।
(२३) वीरशैवाचारप्रदीपिका, वी० लि० ब्रा० ग्रन्थमाला, सोलापुर १९०५ ई० ।
(२४) वेदान्तसारवीरशैवचिन्तामणिः, वी० लि० ब्रा० ग्रन्थमाला, सोलापुर १९०५ ई० ।
(२५) शङ्करदिग्विजयः, ज्ञानमन्दिर, हरद्वार २००० वि० सं० ।
(२६) शिवमहापुराणम्, पण्डित पुस्तकालय, काशी २०२० वि० सं० ।
(२७) शैवरत्नाकर, वी० लि० ब्रा० ग्रन्थमाला, सोलापुर १९०९ ई० ।
(२८) श्रीमद्भगवद्गीता, मुंशीराम मनोहरलाल, नई दिल्ली १९७८ ई० ।
(२९) सिद्धान्तशिखामणिः, वी० लि० ब्रा० ग्रन्थमाला; सोलापुर १९०५ ई० ।
(३०) सिद्धान्तशिखोपनिषद्वीरशैवभाष्यम्, काशीनाथ ग्रन्थमाला, मैसूर १९३० ई० ।
(३१) सुप्रभेदागमान्तर्गतपञ्चाचार्य-पञ्चमोत्पत्तिप्रकरणम्, वी० लि० ब्रा० ग्रन्थमाला, सोलापुर १९०३ ई० ।
(३२) सूक्ष्मागमः, काशीनाथ ग्रन्थमाला, मैसूर १९५६ ई० ।
(३३) स्कन्दपुराणम्, खेमराज श्रीकृष्णदास, बम्बई १९६५ वि० सं० ।

हिन्दी ग्रन्थ व पत्रिका

(३४) कल्याण मासिकपत्रिका, 'शिवाङ्क', गीताप्रेस, गोरखपुर १९९० वि० सं० ।

(३५) बसवेश्वर के वचन, १-२ भाग, कर्नाटक० वि० वि०, धारवाड़ १९७८ ई० ।

(३६) शैवमत, डॉ० यदुवंशीकृत, बिहार राष्ट्रभाषा परिषद्, पटना १९५५ ई० ।

(३७) हिन्दुत्व, रामदास गौड़कृत, शिवप्रसाद गुप्त, सेवा उपवन, वाराणसी १९३८ ई० ।

(३८) जंगमवाडीमठ की प्राचीनता ।

(३९) नवनीत, हिन्दी मासिक, वर्ष ३३, अंक ५, भारतीय विद्याभवन, बम्बई ।

कन्नड ग्रन्थ

(४०) अष्टावरणविवेक, ष० ब्र० शंभुलिंग शिवाचार्य, बीजापुर १९२३ ई० ।

(४१) वीरशैव साहित्य मत्तु इतिहास, शरण साहित्य कार्यालय, बेंगलोर १९६२ ।

(४२) श्रीजगद्गुरु पञ्चाचार्यरे वीरशैवमतस्थापकरु, चन्द्रशेखर शास्त्री, रायचूर १९७१ ई० ।

(४३) वीरशैव महात्मरु

(४४) शिवाधव शतक

मराठी ग्रन्थ

(४५) वीरशैवरत्न, जंगमवाडीमठ, वाराणसी १९५२ ई० ।

(४६) परमरहस्य, डॉ० शि० शि० स्वामी, वीरमठ, अहमदपुर १९७४ ई० ।

अंग्रेजी ग्रन्थ

(४७) A Handbook of Virasaivism, S. C. Nandimath, Motilal Banarasidas, Delhi, 1979.

(४८) A History of Indian Philosophy, S. N. Dasgupta, Cambridge University Press, Cambridge, 1955.

(४९) A History of South India, K. A. Neelakantha Shastry, Oxford University Press, Oxford, 1966.

---

## विद्वानांचा अभिप्राय

डॉ. चन्द्रशेखर (शर्मा) शिवाचार्य (रिसर्च एसोशिएट, वेदान्त-विभाग, संपूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालय, वाराणसी) हे श्री रेणुकाचार्य आदि पंचाचार्यांनी स्थापन केलेल्या आणि महात्मा बसवेश्वरांच्याद्वारें पुनर्नवीकृत (पुनरुज्जीवित) शक्तिविशिष्टाद्वैत (वीरशैव) मताचें सांगोपांग पर्यालोचन करीत आहेत. रिसर्च एसोशिएटच्यारूपानें आपल्या शोधकार्यासाठीं ह्यांनी जो "शक्तिविशिष्टाद्वैत (वीरशैव) सम्मततत्त्वत्रयविमर्शः" विषय निवडला आहे, तो अत्यन्त महत्त्वपूर्ण आणि अभ्यासू व जिज्ञासूंना अत्यंत रुचेल यात शंका नाहीं.

त्याच परंपरेत लेखकाने हा ग्रंथ "वीरशैव अष्टावरण-विज्ञान" हिन्दी भाषिकांच्या ज्ञानवर्धनार्थं प्रस्तुत केला आहे. या ग्रन्थात साधकासाठी उपादेय (१) गुरु, (२) लिंग, (३) जंगम (शिवाबरोबर अभेदबुद्धि ठेवणारा महापुरुष), (४) विभूति, (५) रुद्राक्ष, (६) मन्त्र, (७) पादोदक व (८) प्रसाद या प्रसिद्ध बहिरंग-अष्टावरणांचे वीरशैवदर्शनानुसार सांगोपांग विवेचन प्रस्तुत केलें आहे. याप्रमाणेंच अंतरंग अष्टावरणांचेंहि विवेचन केलें आहे.

शक्तिविशिष्टाद्वैत दर्शनाचे गंभीर दार्शनिक तसेंच उपासनेच्या बाबींचे प्रांजल शैलीत विवेचन प्रस्तुत करून लेखकाने हिन्दीभाषिक जिज्ञासूंवर महान उपकार केले आहेत. हार्दिक धन्यवाद.

विद्वज्जन या प्रकाशनाचें अभिनन्दन करतील, असा आम्हांस पूर्ण विश्वास आहे.

**रामकरण शर्मा**
कुलपति
सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालय
वाराणसी

अक्षय तृतीया
२०४२ वि० सं०
२३-४-८५

येनेरिताः प्रवर्तन्ते प्राणिनः स्वेषु कर्मसु ।
तं वन्दे परमात्मानं स्वात्मानं सर्वदेहिनाम् ॥
पिनाकफणिबालेन्दुभस्ममन्दाकिनीयुता ।
पवर्गरचिता मूर्तिरपवर्गप्रदाऽस्तु वः ॥

अनेक जन्म-जन्मान्तरींच्या पुण्याचें फल म्हणून मनुष्यजन्म प्राप्त होतो. देवदुर्लभ असें मानवशरीर प्राप्त करून ज्याने धर्म, अर्थ, काम आणि सर्वश्रेष्ठ मोक्षरूप पुरुषार्थ, जो निखिलक्लेशनिवृत्ति व परमानन्दरूप स्वरूपावस्थिती आहे, त्यास प्राप्त न केल्यास, त्याला दुर्भाग्यामुळे अनन्तकालपर्यंत जन्म-मरण लक्षण दुर्गति प्राप्त होते; हे शास्त्र, युक्ति, तर्क व अनुभवगम्य आहे.

चारही पुरुषार्थांसाठी भिन्न-भिन्न शास्त्रें बनलीं आहेत. त्याद्वारें मनुष्यास साधनांचे ज्ञान होऊन साधनानुष्ठानानंतर पुरुषार्थ, परमपुरुषार्थ मोक्ष प्राप्त करू शकतो. अतः धर्माचे स्वरूप व साधनांसाठी धर्मशास्त्र, अर्थप्राप्तीच्या उपाययोजनेसाठी अर्थशास्त्र, कामाचे स्वरूप आणि त्याच्या धर्माविरुद्ध सेवनासाठी वात्स्यायनमहर्षिप्रणित कामसूत्र, व्याख्या व स्मृति उपलब्ध आहेत. मोक्ष, जो परमपुरुषार्थ आहे, आणि जो प्राप्त झाल्यानन्तर पुन्हां काहींच प्राप्त करणें शिल्लक राहात नाहीं, त्यासाठीं वेदान्तशास्त्र आहे, ज्यामध्यें उपनिषद् आणि तन्मूलक ब्रह्मसूत्र, गीता तथा त्यांची व्याख्यानें-उपव्याख्यानें आहेत.

आता असें विचारलें जाऊ शकतें कीं, आत्मस्वरूपेणावस्थितीच मोक्ष आहे. अर्थात् शरीरेन्द्रियमनोबुद्धिप्राणादिव्यतिरिक्त ज्योतिःस्वरूप नित्य शुद्धबुद्धात्ममात्ररूपाने विलक्षण अवस्थावान् आत्माच मोक्ष होय. तो मुक्त आहे. या स्थितीला श्रुति संकेतित करते कीं—

"अशरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः"

या उपनिषदातील वाक्यार्थाचे ब्रह्मसूत्राच्या "तत्तु समन्वयात्" ( १-१-४ ) भाष्यात परमगंभीर विचार समुपलब्ध आहे. मोक्ष ही आत्मस्वरूपेणावस्थितीच आहे, तर तो दुष्कर कां झाला आहे ? आत्मा सदैव सन्निहितच आहे. या शंकेचे समाधान असें केलें जाऊ शकतें कीं अज्ञानानें आत्मा आवृत आहे. आत्म्यावर

अज्ञानाचे आवरण आहे. आवरणाची निवृत्ती झाली कीं आत्मा, मेघावृत ( मेघातून वर आलेला ) आणि अप्रतीयमान भगवान· सूर्याप्रमाणे, वेगवान वायूमुळे मेघपटल दूर झाल्यानंतर, नितांत प्रचंड प्रकाशपुंज उपलब्ध झाल्याप्रमाणें परमानन्दस्वरूप अवस्था प्राप्त करतो. हीच गोष्ट गीता, ब्रह्मसूत्र आदि ग्रंथांत सांगितली आहे.

अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः।
ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥

"आविर्भूतस्वरूपस्तु" इति. अज्ञानरूपी आवरण निवृत्त करणें, दूर सारणें, हेंच ब्रह्मज्ञान अथवा आत्मज्ञानाचें प्रयोजन होय, असा निष्कर्ष निष्पन्न होतो. अनुभवी संतांनी आपल्या वचनात म्हटलें आहे—

मलविक्षेपावरण यह लगी उपाधी तीन।
दीख परे किमि आत्मा अन्तःकरण मलीन ॥

म्हणून ब्रह्माकार वृत्तीचे 'आवरणाभिभवार्थावृत्ति' या शब्दानें वेदान्त-ग्रंथांत विवेचन केलें आहे.

वेदान्तशास्त्राच्या व्याख्यानभेदानें शाङ्कर, रामानुज, मध्व, वल्लभ, रामानन्द, गौडीय, निम्बार्क इ. अनेक स्रोत झाले आहेत. अशाच प्रकारची एक शाखा 'शक्तिविशिष्टाद्वैत' वेदान्त ही आहे. तिचें विशेषतः वीरशैव सम्प्र-दायामध्यें अध्ययन-अध्यापन होते. त्या वेदान्ताचे ज्ञाते व वेदान्तविभागाचे अनुसन्धानोपाध्याय ( रिसर्च एसोशिएट ) डॉ. चन्द्रशेखर शर्मा ( शिवाचार्य ) हिरेमठ यांनी लिहिलेलें "वीरशैव अष्टावरण-विज्ञान" हें पुस्तक मी पाहिलें आहे. या पुस्तकात अष्टावरणांचा नामनिर्देश केला आहे, मला वाटतें कीं आवरण निवर्तक असल्यामुळें त्यांना आवरण म्हटलें आहे. दुसरा असाहि अर्थ आहे. आवरण = घेर ( रक्षक ). त्याला झाकणही संबोधले जाते. अतः या आठ आवरणांनी, रक्षकांनी व सुरक्षिततेच्या साधनांनी मनुष्य सुरक्षित रहातो, स्वस्वरूपापासून च्युत होऊ शकत नाहीं. अष्टावरण—गुरु, लिंग, जंगम, विभूति, रुद्राक्ष, मन्त्र, पादोदक व प्रसाद.

कठोपनिषदात ज्ञानशब्द ज्ञानजनक ज्ञानेंद्रियाच्या अभिप्रायानें प्रयुक्त आहे—

यदा पञ्चावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह ।
बुद्धिर्विचेष्टते नापि तामाहुः परमां गतिम् ।।

जसे वेदान्तशास्त्रात, 'अर्थापत्ति' शब्द प्रमाण व प्रमेय उभयार्थाच्या तात्पर्यानें प्रयुक्त असतो, प्रत्यक्ष शब्दच ज्ञान, विषय व करण इन्द्रियांचा बोधक आहे. "प्रत्यक्षं ज्ञानम्, प्रत्यक्षो घटादिः, चक्षुरादिः प्रत्यक्षं प्रमाणम्, तद्वतच अर्थ शब्द "अ र्थोऽभिधेयरैवस्तुप्रयोजननिवृत्तिषु" या कोशातील प्रमाणाने धनादि-प्रमाणेंच निवृत्ति अर्थीहि प्रयुक्त असतो. "मशकार्थो धूमः" येथे मशकाची निवृत्ती करणेंच वाक्यार्थं आहे. तद्वतच आत्म्याचे अज्ञान, आवरणाची निवृत्ति करणारे आठ परमसाधनांना वीरशैव सिद्धान्तात 'अष्टावरण' शब्दाने संबोधिले आहे.

या पुस्तकात डॉ. चन्द्रशेखर शर्मा (शिवाचार्य) हिरेमठ यांनी पूर्व-दर्शित तत्त्वें व अन्य गूढ विषय स्पष्ट केले आहेत. हिन्दी भाषेंत ग्रंथ लिहिल्याने अधिक लोकांना लाभ होईल. सांप्रत शासनही हिन्दी भाषेचा उपयोग, प्रचार-प्रसार करण्यात लक्ष देत आहे. या ग्रंथाचा समादर होवो. हीं तत्त्वे अनेकानेक व्यक्ति अवगत करून कल्याणप्राप्ती करोत. ॐ शम्, शान्तिः शान्तिः शान्तिः.

अक्षय तृतीया
२०४२ वि० सं०
२३-४-८५

**देवस्वरूप मिश्र**
वेदान्तविभागाध्यक्ष
सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालय
वाराणसी

वीरशैव धर्म-दर्शनाचे परिनिष्ठित विद्वान डॉ. चन्द्रशेखर शर्मा हिरेमठ यांनी लिहिलेल्या "वीरशैव अष्टावरण-विज्ञान" ग्रंथाचें व त्यावर लिहिलेल्या विद्वत्तापूर्ण उपोद्‌घाताचें मी मोठ्या सावधानतेनें अध्ययन केले. लोककल्याणाच्या दृष्टीने लिहिलेल्या या छोटयाशा ग्रंथात आधुनिक समाजास सुसंघटित करण्याची पर्याप्त सामग्री विद्यमान आहे, असे म्हणणे अनुचित होणार नाही.

अन्य विशिष्ट भारतीय दर्शनांप्रमाणें वीरशैव दर्शनालाहि स्वतःची अशी विशिष्ट दृष्टी आहे. ही दृष्टी विशेषाद्वैत, शिवाद्वैत, शक्तिविशिष्टाद्वैत आदि सार्थ नावांनी अभिहित झाली आहे. या दृष्टीनुरूपच या ग्रंथात वेदागमतंत्र-शास्त्रसंमत आचारमीमांसेची अवधारणा करण्यात आली आहे. तींत प्रामुख्याने अष्टावरण, पञ्चाचार व षट्स्थल यांचा समावेश आहे. त्यांतही अष्टावरणांचे विशिष्ट स्थान आहे. या अष्टावरणांची वैज्ञानिक व्याख्या प्रस्तुत करणें हाच या ग्रन्थाचा एकमेव विषय आहे. आवरण शब्दाची व्याख्या ग्रंथकारांनी स्वतःच केली आहे. त्यानुसार गुरु, लिंग आदि आठ आवरण साधकांसाठी रक्षाकवचाचें काम करतात. सर्व प्रकारच्या सांसारिक उपद्रवां-पासून त्याचें रक्षण करीत राहतात.

आगम व तंत्रशास्त्रात आवरण शब्दाचा प्रयोग विशिष्ट अर्थानें होतो. तेथें पंचावरण, नवावरण इत्यादि शब्दांचा प्रयोग आढळतो. येथें मध्यभागात इष्टदेवाच्या आणि त्यानंतर प्रत्येक आवरणात अंगदेवतांच्या पूजेचें विधान आहे. प्रस्तुत अष्टावरणाची आम्हीं अशाप्रकारेंही व्याख्या करूं शकतों. शक्तिविशिष्ट शिवाबरोबर अद्वैतभावापन्न साधकाची स्थिती निम्म्या भागांत आहे. आणि या स्थितीस पोहोचण्यासाठी गुरु, लिंग, जंगम इ. च्या उपासनेद्वारे तो स्वतःला चहूं बाजूंनी सुरक्षित करून घेतो. साहित्यांत सात कक्षांच्या ( दालनें ) राजप्रासादाचें वर्णन आढळते. यांचीहि रचना सुरक्षेच्या दृष्टीनेच केली जाते. "एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि" महर्षि वाल्मिकींची ही उक्ति तेव्हांच सार्थ होऊ शकते, जेव्हां साधक सांसारिक विपत्तीपासून सुरक्षित राहू शकतो. अंतरंग व बहिरंग द्विविध अष्टावरणांचे

सम्यक् पालन केल्यानं साधकाला ही स्थिती सहज रूपानें प्राप्त होऊ शकते. अंतरंग-अष्टावरणांचा परिचय ग्रंथकारांनी ग्रंथाचा उपसंहार करतांना आणि ग्रंथाच्या शेवटी देण्यात आलेल्या कोष्टकात दिला आहे. अशाप्रकारें या द्विविध अष्टावरणांचा परिचय राष्ट्रभाषा हिन्दीमध्यें प्रथम देऊन कन्नड-भाषिक श्री शर्मांनी अभिनंदनीय प्रयत्न केला आहे. ते धन्यवादास पात्र आहेत.

उपोद्घातात या विद्वान लेखकांनी भिन्न भिन्न आक्षेपांचा परिहार करून वीरशैव धर्म-दर्शनाची वेदागममूलकता सिद्ध केली आहे. वीरशैव, लिंगायत, विशेषाद्वैत आदि शब्दांची व्याख्या करून वीरशैव धर्म-दर्शनाचा संक्षिप्त परिचय दिल्यानंतर या मताचे संस्थापक आचार्यांचा इतिहास प्रस्तुत केला आहे. ऐतिहासिक प्रमाणांच्या आधारावर त्याची प्राचीनता सिद्ध केली आहे. संस्कृत भाषेंत असलेल्या, या मताच्या साहित्याचा परिचयसुद्धां यात दिला आहे. अशाप्रकारें या उपोद्घातानें वीरशैव धर्म-दर्शनाची प्रमुख वैशिष्टचें हृदयंगम करण्यास सहाय्य मिळालें आहे.

ज्ञानगुरु भगवान् विश्वेश्वरांना आम्ही प्रार्थना करितों कीं, त्यांनी श्री शर्मा यांना वीरशैव धर्म-दर्शनाच्या प्रचार-प्रसारांत निरंतर दत्तचित्त रहाण्या-साठी संस्कृत आणि कन्नड साहित्यात संग्रहित असलेले आचार्य आणि सन्तांचे उपदेश राष्ट्रभाषेच्या माध्यमातून समग्र भारतीय जनतेसमोर समुपस्थापित करण्यास समर्थ होण्यासाठी पवित्र प्रेरणा द्यावी.

अक्षय तृतीया
२०४२ वि० सं०
२३-४-८५

**व्रजवल्लभ द्विवेदी**
'शास्त्रचूडामणि', योगतन्त्र-विभाग
सम्पूर्णानन्द संस्कृत विश्वविद्यालय
वाराणसी

श्री कुमार कोठावळे आपण "वीरशैव अष्टावरण-विज्ञान" ह्या हिन्दी मूळ ग्रन्थ चे मराठी भाषांतर आठवड्याच्या आंत करून आपला चमत्कार दाखविला आहे वीरशैव वाङ्मयाचे उत्तम ज्ञाता, साहित्यकार, नाटककार, टीकाकार, प्रतिभावान् कवि आणि पत्रकार ह्या विविधरूपानें महाराष्ट्रभर आपली प्रसिद्धि आहे. सध्या हे सोलापुर चे प्रसिद्ध दैनिक वृत्तपत्र "संचार" चे सहसंपादक आहेत.



श्री कुमार कोठावळे

## डॉ. चन्द्रशेखर शिवाचार्य ह्यांचे नवीन प्रकाशित ग्रन्थ

| | | | |
|---|---|---|---|
| १. वीरशैव अष्टावरण-विज्ञान | | हिन्दी | १५·०० |
| २. वीरशैव धर्म-दर्शन का संक्षिप्त इतिहास | | ,, | १-०० |
| ३. वीरशैव दर्शन कोष | | ,, | यन्त्रस्थ |
| ४. वीरशैवदर्शनेतिहासदिग्दर्शनम् | | संस्कृत | २-५० |
| ५. सिद्धान्तशिखामणिसमयसमीक्षा | | ,, | २-५० |
| ६. सिद्धान्तशिखामणि-प्रवचनप्रभे | | कन्नड | |
| | किरण १ | ,, | ४-०० |
| ७. ,, ,, , | ,, २ | ,, | ३-०० |
| ८. ,, ,, ,, | ,, ३ | ,, | ५-०० |
| ९. ,, ,, ,, | ,, ४ | ,, | ५-०० |
| १०. ,, ,, ,, | पूर्वपीठिका | ,, | ५-०० |